विकिरणमण्डळाचें २२ वें पुस्तक

# अभागी कमल !

[ सामाजिक खण्डकाव्य ]

गिरीश

सदस्य रविकिरणमण्डळ

आवृत्ति दुसरी

रविवार

२८ आक्टोबर १९३४

पुणें

किंमत १ रुपया

## रविकिरणमण्डळ

गजानन त्र्यम्बक माडखोलकर
यशवन्त दिनकर पेण्ढरकर
श्रीधर बाळकृष्ण रानडे, एम्. एस्सी.
[ सौ. मनोरमाबाई रानडे, बी. ए. ]
विठ्ठल दत्तात्रय घाटे, एम्.ए., बी. टी., टी. डी.
माधव त्रिम्बक पटवर्धन, एम्. ए.
दत्तात्रय लक्ष्मण गोखले, एम्. ए., बी. टी.
शङ्कर केशव कानेटकर, एम्. ए.

२०८



प्रकाशक :– मधुसूदन शङ्कर कानेटकर
५६५ नारायण, गोखले वाडा, पुणें २

मुद्रक :– ल. ना. चापेकर, 'आर्यसंस्कृति मुद्रणालय'
चिमणबाग, टिळकरस्ता, १९८।१७ सदाशिव, पुणें २

# अनुक्रमणिका





# आशीर्वाद

......'त्यांनीं काही भाग वाचून दाखविले तेव्हा सबन्ध काव्य वाचण्याची मला इच्छा झाली व त्याच्या हस्तलिखित प्रतीवरून तें मी वाचले....हे काव्य हृदयङ्गम आहे. विधवेच्या करुणकहाणीचे चित्र अन्तरङ्गात उठविण्याचे सामर्थ्य त्याच्यात आहे. त्यातले काही भाग तर मनाला चटका लावून मोडणारे आहेत. भाषा सुबोध असून वाचता वाचता अर्थ मनात उतरला जातो. वर्णनात अतिशयोक्ति आहे तथापि वस्तुस्थितीची जाणीव करून देऊन मनात तळमळ उत्पन्न करण्यास तिची मदत होईल......विधवाच्या दुःखाचें परिमार्जन करण्याविषयीं लोकमताची अनुकूलता उत्पन्न केली पाहिजे व त्याकामी श्री. गिरीश याच्या काव्याचा उपयोग होईल.'

हिंगणें बुद्रुक पुणें
२९-१-१९२३

धोण्डो केशव कर्वे

# प्रस्तावना

श्रीयुत शङ्कर केशव कानेटकर, बी. ए. हे महाराष्ट्रास 'गिरीश' या नावानें माहित आहेतच. त्यानीं आपल्या 'अभागी कमल' या काव्याचा वाचकाशीं मीं परिचय करावा अशी इच्छा दर्शविली.

'अभागी कमल' हें काव्य लिहिण्यास स्फूर्ति होण्याचे कारण कवींनीं आपल्या 'प्रवेशात' साङ्गितलेंच आहे. लहानच गोष्ट! पण ती कवीच्या नाजुक मनावर कशी परिणामकारक झाली याचें प्रत्यन्तर वरील काव्यच आहे. या काव्यांत करुणरस प्रधान आहे; आणि हें साकीवृत्तात म्हणजे सोप्या वृत्तात व साध्या शब्दांत लिहिलें असल्याकारणाने सर्वसाधारण वाचकाच्या समजशक्तीच्या मर्यादेंत आहे; आणि म्हणूनच तें पुष्कळ जनसमूहाच्या वाचनात येईल. काव्यास आरम्भ कृष्णातीरीं होऊन ते तेथेच सम्पलें आहे. यात महाराष्ट्रीयास परिचित असलेल्या कृष्णातीरावरील स्थानांचीं वर्णनें तर हुबेहूब रेखाटलीं आहेत. केवळ काव्य करणें, हा कवीचा हेतु नसून, काव्याचा इष्ट परिणाम घडून यावा हाही हेतु असल्यामुळें, यात कृत्रिमपणा आलेला नाहीं. 'कवीचें हृदय भावनानीं ओतप्रोत भरून जाऊन त्यातून स्वाभाविकपणें बाहेर पडणारे विचार' अशी काव्याची व्याख्या करितात, आणि त्याचप्रमाणें वरील काव्य झालें आहे.

यातील सृष्टिवर्णनें फारच बहारीचीं व वस्तुस्थितीचें बरोबर चित्र उमटविणारीं अशी आहेत. एकादी क्षुल्लक गोष्टही कवीच्या नजरेंतून चुकून वर्णनाबाहेर राहिलेली नसल्यामुळें ती पूर्ण व हृदयङ्गम अशींच झालीं आहेत.

मनुष्यस्वभाव व मन:स्थिति वर्णन करण्याची कवीची शैली फार वाखाणण्यासारखी आहे. नदीवरील समोरील दृश्य—बालकासह नौका-विहार करणारें तरुण जोडपें—पाहून कमलेच्या मनात आलेले विचार व त्यामुळें झालेली पूर्वस्मृति, आणि याचाच परिणाम तिला पडलेले स्वप्न हें सर्व मनुष्यस्वभावाला पूर्ण अनुसरून आहे. बागेतील फुलाशीं कमलेचें सम्भाषण मनुष्यस्वभावाशीं अगदीं जुळणारें आहे. मनुष्य दुक्खी असला म्हणजे त्याला सर्व जग दुक्खी भासतें, आणि सम-दुक्खी मित्र मिळण्यात त्याला समाधान वाटतें असा मनुष्यस्वभा-वच आहे. याचें अवलोकन कवींनीं सूक्ष्मतेनें केले आहे असें दिसून येतें. तेराव्या पाकळीमधील 'लीलेच्या लीले' मुळें मन दूषित झालेल्या सासूचें घालून पाडून बोलणें वाचलें म्हणजे कवींनीं एकाद्या अविचारी तामसी सासूचें बोलणें ऐकून घेऊन तेंच लिहून घेतलें होतें कीं काय असें क्षणभर वाटतें. चवदाव्या पाकळीतील

'भडकत गेले विचार कोठे, जीव नकोसा झाला !
घाव जिव्हारी बसता, जगणें गोड गमे न जिवाला !
लाल जाहले नेत्र विचारीं फेकी भेसुर दृष्टी
एकच दृक्पातानें वाटें भस्म करी ही सृष्टी
सन्तापाची लहर भयङ्कर ! शब्दाचा खञ्जीर
भिडे काळजा लावुनि जीवा कायमचा परि घोर !
थरथर कापे ओठ, दाटला हृदयीं थोर उमाळा
प्रेतावरती जिवन्त, पडल्या अश्रुफुलांच्या माळा !'

इत्यादि दुक्खातिशयानें अत्यन्त सन्तप्त झालेल्या व जीवास कण्टाळ-लेल्या कमलेचें वर्णन तिचें करुणास्पद व भेसुर चित्र डोळ्यांपुढें उभें करितें. तिच्या निष्कारण छळाबद्दल तिची दया येते आणि अशी वागणूक जगानें तिच्याशीं ठेवणें हें अन्याय्य आहे असें वाटतें. विष

यांचीं मनें किती पोळलेलीं व कोवळीं असतात हें या काव्यांत चाङ्गलें निदर्शनास आणिलें आहे. पण अरविन्दाच्या कमलेवरील प्रेमाचा शुद्धपणा व सात्विकपणा जितका स्पष्ट दिसून येतो, तितका तिच्या प्रेमामध्यें आहे असें स्पष्ट दिसत नाहीं. कमलेची तिच्या पती-वरील निष्ठा, भक्ति व प्रेम हीं जास्त स्पष्टपणें व्यक्त व्हावयास पाहिजे होतीं. तथापि दुःखाचा कडेलोट झाल्यानन्तर कमलेचा उद्वेग व तिच्या मनात येणारे विचार—

'नाव बुडविलं ! कुणीं बुडविल ! कोणाचं ! मीं केव्हा !
कुणा लाविली काळोखी मीं ! कधी, कशाला, देवा !
सोङ्ग फुलाचं–सोङ्ग फुलाचं, कुणीं, कशाला केलं !
नाव कुणाचं साङ्ग बुडालं ! काय मला आठवलं !
अरविन्दाचा–हाय ! कशाला पुण्यवन्त तें नाव !
ऐकुनि देवा, साङ्ग साङ्ग, हे, काय जगात जगावं !'

हे स्वाभाविक ओघाप्रमाणेंच दिले आहेत. आणि त्यानन्तर विधवाच्या– त्यांतल्यात्यात कजाग सास्वा व द्वेषी नणन्दा याच्या हाताखालीं, व अन्यायी जनता याच्या पापी नजरेखालीं असलेल्या– बालविधवाच्या– स्थितीचें वर्णन व जगाची त्याच्याशीं वागणूक, हीं कमलेच्या शब्दात फार परिणामकारक रीतीने वर्णिलेलीं आहेत. त्याचा परिणाम कोणाच्याही मनावर झाल्याशिवाय राहाणार नाही. हिन्दू विधवा म्हणजे घरांतील पोतेरें! त्यांनीं घरांतील कामें करीत लोकांचे कर्णकटु, हृदयभेदक टोमणे ऐकतच, राहिलेलें आयुष्य सम्पविलें पाहिजे, अशी रूढि आहे. तिल घराबाहेर जाण्याची, बन्धूबरोबर बोलण्याची चोरी झालेली असते. तिला घरांतील कारभारांत कोणताही अधिकार नाहीं व घरांतील एकाही वस्तूवर तिची सत्ता

नाही अशी परिस्थिति, रूढीनें पाठिम्बा दिलेल्या व धर्म म्हणून स्तोम माजविण्यांत आलेल्या नियमांनीं उत्पन्न झालेली आहे. तिचें दर्शनही अपशकुनी धरलें जातें ! ती सकेशा असेल, तर तिनें केलेला स्वयम्पाक अशुद्ध धरला जातो; तिचीं फुलें, तिचा स्पर्श झालेलें पाणी, तिचें काहीएक देवाला चालत नाही असें रुढीमुळें मानलें जातें. पण परम कृपाळू व दीनवत्सल परमेश्वरापाशीं भेदाभेद नाही हें 'बऱ्याच शास्त्र्यां'च्याही ध्यानात येत नाही !

पण शिक्षणाचा प्रसार जसजसा होत चालला आहे, तसतशी वरील स्थितिही पालटत आहे असें सुदैवानें दिसून येतें. सगळ्याच सास्वा व नणन्दा काव्यांतील सासूनणन्देप्रमाणें कजाग, अविचारी व खोट्या असतील असें सम्भवत नाहीं. परन्तु खेडेगावात, जेथें अजून शिक्षणाचा प्रवेश झाला नाहीं तेथें, काव्यात वर्णन केलें आहे त्या सारखीं काही चित्रें दृष्टीस पडतील.

अरविन्दाचें चित्र मात्र खरोखर उत्कृष्ट रेखाटलें आहे. असे तरुण उदयास आल्यास देश फार वेळ अशा दीन स्थितींत राहणार नाहीं. त्याचें वर्णनच पहा—

'मर्दपणाची मोहक जादू विलसे वदनावरती
विद्वत्तेची नवी तरतरी भालीं खेळत होती

---

१ पण्ढरपूरसारख्या प्रसिद्ध देवस्थानीं—जेथील देव—श्रीविठ्ठल दीन अनाथांचा मायबाप व भक्तवत्सल म्हणून वर्णिला आहे, आणि म्हणूनच जेथें ब्राह्मणाखेरीज इतर सोनार, शिम्पी, मराठे वगैरे जातींनींही मूर्तीचे पायावर डोकें ठेवून नमस्कार करण्याचा प्रघात आहे तेथें— या दीन वर्गाला मात्र 'मूर्तीला विटाळ होईल' या (वेड्या) कल्पनेनें मनाई केली जाते ! केवढा हा अन्याय ! 'धर्म' या नांवाखाली किती अन्याय होत आहे याचें हें एक चाङ्गलेंच उदाहरण आहे.

अधरावरती लिहिला होता देशभक्तिचा भाव
गालावरती रङ्गत होता प्रेमाचा नव डाव
कारुण्याचें पाणी होतें तेजस्वी नयनांत
दूरदृष्टिची नजर विजेची भरली होती त्यांत
पावित्र्याची लहर तनूवर चमके तेजःपुञ्ज
अभिमानाचा फुलला होता तीवर सुन्दर कुञ्ज
विशाल वक्षस्थलीं विराजे औदार्याचा भाव
देशभक्तिचें निशाण आला फडकविण्याला राव
नव्या मनूच्या सुधारणेचा शिलेदार हा शूर
जुन्या रणावर गाजविण्याला येई नवी समशेर'

या बारा ओळी वाचून एका तेजस्वी व उदाहरणीय तरुणाचें चित्र डोळ्यासमोर येतें. त्याच्या मनाची देशस्थितीबद्दल कळकळ व ती सुधारण्याची उत्कट इच्छा कवींनीं चाङ्गली वर्णिलेली आहे. त्याचें कमलेवरील शुद्ध व सात्विक प्रेम, त्याच्या मनाचा उदात्तपणा व स्वार्थत्याग चाङ्गला दाखविला आहे. पुढील

'भोजन करूनी वधूवराना सौख्यायू चिन्तून
घरा परतला परोपरीनें स्वमना समजावून
एक दिनीं मग अपुल्या सदनीं जेवायाला त्यांना
आमन्त्रूनी स्नेहभरानें रिझवी द्वन्द्वावांना'

या ओळींत किंवा

'हातानीं मग तिला खुणावी कीं 'पाहुनि दोघास
जीव सुखावे; तुझ्या सुखाविण जिवास नव्हती आस'

या ओळींत त्याची मनःप्रवृत्ति दिसून येते. त्याचा स्वार्थत्याग त्यानें कमलेच्या– ' लगीन केव्हां करावयाचं मनांत आहे आता?' या प्रश्नास दिलेल्या उत्तरांत दिसून येतो. आजन्म अविवाहित राहून

देशाची स्थिति सुधारण्यास तो तयार झाला आहे. त्याच्या कमलेवरील प्रेमामुळें तो तिच्या दुक्खाच्या वेळीं हजर राहतो. शेवटच्या प्रसङ्गीं तो भानावर येऊन, कमलेनें उडी टाकल्याचें त्याच्या ध्यानात येतांच जिवाचीही पर्वा न करता भर पुराच्या नदींत उडी टाकून तिला वांचविण्याचा प्रयत्न करतो. पण विधिघटनेपुढें त्याचा नाइलाज झाल ा! शेवटीं त्याला कमलेची शेवटली भेट व तिचा शेवटला निरोप साङ्गणारें असें छायाचित्र मिळतें आणि तो प्रिय भगिनीच्या वियोगामुळें होणारें असह्य दुक्ख गिळून, तिची शेवटली विनन्ति पूर्णपणें पाळण्यास झटत राहतो. या काव्यांत कमल आणि अरविन्द याची तुलना केली असता अरविन्दच अधिक श्रेष्ठ टरतो.

काव्य, कमलेच्या जीव देण्यामुळें शोकपर्यवसायी व त्यामुळेच अत्यन्त परिणामकारक झालें आहे. त्याच्या वाचनानें अरविन्दासारखे स्वार्थत्यागी, भगिनींचीं दुक्खें निवारण्यास जिवापलीकडे झटणारे देशसेवक तरुण वीर उदयास येवोत आणि हिन्दू स्त्रियाचा दर्जा वाढून, विधवांची दया येण्यासारखी स्थिति पालटो, एवढीच इच्छा आहे.

सेवासदन पुणें
२१ आक्टोबर १९२३

रमाबाई रानडे

*

# प्रवेश

'ज्या राष्ट्रांतील कुटुम्बांत गुलामगिरी व क्रौर्य यांचा अंमल जारीनें गाजत आहे, त्या राष्ट्रास विकळा आलीच पाहिजे.'

—कै० गो. ग. आगरकर

सुमारे चार वर्षापूर्वीची गोष्ट! पण अजून अङ्गावर शहारे येताहेत! त्यावेळीं मला येथील एका स्त्रीसंस्थेत काही विधवामुलींना इङ्ग्रजी शिकविण्यास जावे लागे. त्याच्या मुक्या मनाचा कोमलपणा व निर्मल अन्तःकरणाचा निर्व्याज प्रेमळपणा पाहून मनांत करुणा उत्पन्न होई, व समाजानें किंवा धर्मानें अशा गरीब भगिनींच्या भावी आयुष्याचा एकही मार्ग नीट आखून ठेवला नाही, याबद्दल वाईट वाटे. उलट, याना अज्ञानात ठेवण्यानें समाज स्वताला जास्तच सङ्कटांत घालीत आहे, असेंही मनात आल्यावाचून राहिले नाही; ही करुणास्पद स्थिति कोणत्यातरी मार्गानें, सात्विक पण करुण भावनानी, समाजाच्या नजरेस आणावी, असें माझ्या मनात आलें व त्याला एकदा एका विलक्षण गोष्टीनें चालन मिळालें.

एक दिवस या विधवाभगिनींना भाषान्तर शिकवीत असतां, त्यांच्याकडून वाक्यें लावून घेण्याचा प्रसङ्ग मजवर आला. वाक्यें लावून घेण्यास सुरवात झाल्यावर, पहिल्या दोन मुलींनीं दोन वाक्यें लाविलीं तोंच तिसरी मुलगी म्हणाली— 'मास्तर, पुढलं वाक्य नको; तें सोडून द्या!' 'कां!' म्हणून विचारण्याचे अगोदरच मी पुस्तकांत पाहिलें, तों तें वाक्य म्हणजे— 'My husband and myself were reading!' हें होतें! त्या मुलीचे डोळे

पाण्यानें भरलें व माझ्या हृदयाचें पाणी पाणी झालें! या एकाच गोष्टीनें माझ्या भावनेस जोराचा हेलकावा बसला!

विधवाचीं मनें किती पोळलेलीं, किती कोवळीं व पवित्र असतात आणि त्यांवर पूर्वायुष्यातील एकाद्या नाजुक स्मृतीचा निसरताही आघात किती वज्रवत् कठोरपरिणामी होतो याची जाणीव मला त्यावेळीं झाली. अशा कोंवळ्या मनाच्या व वैधव्यानें पोळलेल्या ज्या शेंकडों भगिनी आज देशभर दिसत आहेत त्याच्यापैकीं एकीचें तरी करुणचरित्र वेड्यावाकड्या शब्दानीं रेखाटून समाजापुढे ठेवावें व सत्यसृष्टि आणि कल्पनासृष्टि याच्या गोड मीलनानें जगापुढे निर्भेळ सत्य माण्डावें, ही कल्पना मला त्यावेळी सुचली.

दिवाळी आली आणि माझ्या एका भगिनीनें सहज मला कवितेची ओवाळणी मागितली. तिच्याकडे पाहून माझें मन पाझरलें व पूर्व-विचारांना जोराचें चलन मिळून ते प्रस्तुत काव्यरूपानें प्रगट झालें.

प्रत्यक्ष काव्यासम्बन्धी मला फारसें काही म्हणावयाचें नाही.कारण, तो अधिकार वाचकांचा आहे. माझें म्हणणें एवढेंच कीं, हें काव्य एकाङ्गी दृष्टीनें लिहिलेलें नाही. जगांत दयाळू सासवा किंवा नणन्दा नाहीतच असें माझें म्हणणें नाही. ज्या उत्तम सुना असतात त्या उत्तम नणन्दाही असूं शकतात व त्याच पुढे उत्तम सासवाही होतात. पण निःपक्षपातबुद्धीनें पाहणाऱ्या सर्वसाधारण निरीक्षकांस हिन्दू विध-वांचें चित्र कसें दिसत असेल, हेंच विशेषतः रेखाटण्याचा यांत प्रयत्न केला आहे.ही गोष्ट लक्षात घेऊन बन्धुभगिनी मला क्षमा करतील अशी आशा आहे. कमलेची करुण कहाणी ऐकून, सत्यसृष्टींत, दुःख-पङ्कांत रात्रंदिवस पिचत पडलेल्या निरुपद्रवी कमलांवर दयाबुद्धी धर-ण्याची इच्छा समाजास झाल्यास मी त्यांत सार्थक समजेन.

समाजसुधारणेसम्बन्धींचे गुरु. आगरकर यांचें अग्रभागीं दिलेलें अवतरण ज्यांना अपुरें वाटेल, त्या वाचकांसाठी मी पुढील उतारा देत आहें. आमच्या बन्धुवर्गासम्बन्धी लिहितांना ते म्हणतात—

‘ अरेरे ! आमच्या पुरुषवर्गाच्या पक्षपातानें व मनाच्या कठोरत्वानें बिचाऱ्या स्त्रियावर असे अनर्थ ओढवत असून व सर्वाहून प्रिय अशा प्राणाचीही आहुति देण्याचा त्यांजवर येत असलेला भयङ्कर प्रसङ्ग आम्ही डोळ्यांनीं प्रत्यक्ष पहात असून त्याचा प्रतिकार करण्याची आम्हास वासना होऊं नये, व हेंच त्याच्या जन्माचें सार्थक, म्हणून आम्हीं वरळत सुटावें, याहून आमच्या मतिभ्रष्टतेचें दुसरें कोणते उदाहरण पाहिजे ! ’

अरविन्दाच्या देखत कमलेनें का व कशी उडी टाकिली याचे रहस्य या उताऱ्यावरुन वाचकाच्या चाङ्गले ध्यानात येईलसे वाटतें. पण हे विचार आता जुने झाले, असे म्हणणारेही काही आहेत. त्याच्या भ्रमनिरसनासाठीं, आजच्या समाजाच्या मनोरचनेसम्बन्धी, व तेही विशेषतः एका अनुभविक भगिनीचे उद्गार मी वाचकाना सादर करीत आहें. प्रस्तुत काव्य लिहिल्यानन्तर सुमारें तीन वर्षानीं म्हणजे ता. ८ ऑगस्ट १९२३ च्या ‘ ज्ञानप्रकाशा ’त या ‘ जिज्ञासु भगिनी ’ लिहितात—

‘ पण पतीच्या अभावीं ती ( कालची सच्छील स्त्री ) आज अपवित्र ठरते. पतीच्या अल्पायुत्वामुळें तिचा अपशकुन होतो. या गोष्टीस आमच्या आद्यधर्मशास्त्राचा आधार असेल असें वाटत नाही. पण हलीचें रूढ शास्त्र त्याच्याही पलीकडे जात असतें. धर्मशास्त्रासम्बन्धी अज्ञ स्त्रियाच्या मनात विपरीत भावना असल्यामुळें प्रायः अनाथ विधवांचा छळ पुरुषापेक्षा स्त्रियांकडूनच ज्यास्त केला जातो. सकेशा स्त्रियांना धार्मिक कृत्याची साफ मनाई आमच्या सदय

आद्य ऋषिमुनींनीं केली असावी हें मनाला पटत नाही. तथापि आजचें शास्त्र त्यांना पाण्यालाही स्पर्श करूं देत नाही. अशा स्थितींत मानस-सपूजेखेरीज त्यांना ईश्वरोपासनेचा दुसरा मार्गच नाही. बरें, एकादी स्वतन्त्र बाण्याची सकेशा अत्यन्त श्रद्धेनें फक्त तुळशीची जर पूजा करीत असली तरी तिच्यावर, तुळशीला विटाळ केल्याचें महत्पातक लादलें जातें. आमचा बन्धुवर्ग त्याकडे दुर्लक्ष करीत असतो म्हणा किंवा, गृहिणीला उपदेश करण्याचें धैर्य नसल्यामुळें म्हणा, कौतुकानें असले उद्गार ऐकत, बहुतेक अंशीं तटस्थ वृत्तीच स्वीकारीत असतो.'

मी रेखाटलेलें आजच्या स्थितीचें चित्र व प्रस्तुत काव्यलेखना-नन्तर सुमारे तीन वर्षांनीं निघालेले वरील जिज्ञासु भगिनीचे उद्गार यात काही साम्य आढळतें का, हें वाचकांनीं शोधून पहावें.

स्त्री-शिक्षणाच्या गङ्गेचा प्रवाह अद्याप खेडोंपाडीं जाऊन पोहों-चला नसल्यामुळें शहरांत कितीही सुधारणा झाली, तरी इतर ठिकाणीं कशी स्थिति आहे, हें दाखविण्यासाठीच काव्याला 'कृष्णाकाठ' हें स्थान आधारभूत कल्पिलें आहे. तसेंच समाजापुढे काल्पनिक ध्येय ठेवण्यापेक्षा, किंवा हातीं घेतलेला प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करण्या-पेक्षा वस्तुस्थिति यथार्थतेनें रङ्गवून तींत हिन्दू विधवेचें सर्वसाधारण चित्र रङ्गविण्याचा मी प्रयत्न केला आहे.

मला शेवटीं इतकेंच साङ्गावयाचं आहे कीं, दृष्टीचा कोन विशाल करून आपल्या जाणीवीनें परदुःख पाहिलें, तर त्यासारखा दुसरा कोणताही थोर धर्म असेलसें मला वाटत नाही. ज्या समाजांत ही जाणीवच नाही किंवा जेथे रूढी हेंच सर्वस्व, तेथे धर्म तरी जिवन्त आहे कीं नाही याचीच शङ्का येते; व जेथे धर्मच नाही तेथे अनाचार निर्माण झाला तर त्याबद्दल जबाबदार कोण ? अज्ञानी कीं जाणते ?

आणि जाणतेच लोक अज्ञानी व अनाथ माणसांच्या मार्गांत अड-चणी उत्पन्न करूं लागल्यास दोष कोणाचा?

पण ही लाम्बण सरणार नाही. प्रस्तुत काव्यानें समाजबन्धुभगिनीं-वर काही इष्ट परिणाम होऊन त्यातून काही थोडें कां होईना, पण चाङ्गलें निर्माण झालें, तर तेच माझें समाधान होय. केवळ काव्य-सौन्दर्य एवढाच माझ्या लिहिण्याचा हेतु नाही.

प्रस्तुत काव्य प्रथम 'मनोरञ्जन' मधून प्रसिद्ध करण्यास सम्पा-दकांनीं सवड देऊन, महाराष्ट्रवाचकाची सहानुभूति मला जाणिवली, याबद्दल मी त्याचा आभारी आहें.

हें काव्य लिहिल्यानन्तर त्यातील काही दोष सुधारण्यास मला माझे मित्र श्री. शङ्कर बळवन्त कुलकर्णी, श्री. द. ल. गोखले व कवि यशवन्त यांचें अमोलिक सहाय्य झालें. त्याच-प्रमाणें गुरु. अण्णासाहेब कर्वे आणि मातृवत् पूज्य असलेल्या श्रीमती रमाबाईसाहेब रानडे यानीं काही बहुमोल सूचना केल्या व माझ्या अल्प प्रयत्नाचें केवळ वत्सलतेनें व थोर बुद्धीनें कौतुक केलें. याबद्दल त्या सर्वांचे आभार मानून त्याच्या ऋणातून अल्पां-शाने मुटण्यापेक्षा, त्याच्या गोड ऋणातच सदैव राहण्याची माझी इच्छा आहे.

पुणें
२२ आक्टोबर १९२३

गिरीश

# अकरा वर्षांनन्तर

माझें हें काव्य पुस्तकरूपानें प्रथम १९२३ सालीं प्रसिद्ध झालें व त्या वेळीं वाचकबन्धुभगिनींनीं माझ्या अपेक्षेबाहेर व योग्यते-बाहेर त्याचा गौरव केला. त्यानन्तर १९२५ सालींच तें पुनर्मुद्रित व्हावयास पाहिजे होतें. परन्तु माझ्या पुढील चार पुस्तकामुळें त्यास अवसरच मिळाला न ही. आज हें पुस्तक रविकिरणमण्डळाचें २२ वें पुस्तक म्हणून प्रसिद्ध होत आहे.

प्रस्तुत काव्यचित्राची चौकट तीच आहे. पण मूळ चित्रावर मी जरूर तेथे अनेक वेळा कुन्चली फिरविली आहे. त्याचप्रमाणें माझ्या वाङ्मयमित्रानीं व त्या वेळच्या टीकाकारानीं केलेल्या सूचनाचाहि या आवृत्तींत मी विचार केलेला आहे.

पूर्वी हें काव्य प्रसिद्ध झाल्यावर मला माझ्या अनेक वाचक बन्धुभगिनींचीं अभिनन्दनपर पत्रें आलीं, माझ्या काही कविबन्धू-कडून गौरवपर कविता आल्या व वाङ्मयकार्य करणाऱ्या मस्थानीं मला आर्थिक सहानुभूति दाखविली. या सर्वांचे मजवर उपकार आहेत व त्याबद्दल मी सदैव कृतज्ञ आहे. या काव्याचें परिष्करण करीत असतां मला माझ्या एक भगिनी श्री. इन्दिराताई फणसळकर याच्या सूचनांचा फार उपयोग झाला. त्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें जरूर आहे.

पूर्वीच्या आवृत्तींतील कित्येक दोष त्यावेळींच श्रीमती वहिनी-साहेब रानडे यांनीं माझ्या नजरेस आणले होते. या आवृत्तीत ते मी काढून टाकले आहेत, हें पाहतांना त्यांना खात्रीनें आनन्द झाला असता. पण आज त्या हें पहाण्यास नाहीत, म्हणून मन क्षणभर विषण्ण झाल्याखेरीज रहात नाही !

पुणें २७ ऑक्टोबर १९३४] गिरीश

# अभागी कमल !

## पाकळी १ ली

## कृष्णाकाठीं

भणभण वारा खालुन वरती वाहे आवेगात
बाळवण्टिचा भिरकावोनी पाचोळा गगनात
वाळूचे कण सान जाउनी त्याच्यासङ्गें वरती
सुवर्ण कृष्णाजळात पडुनी चुव् चुव् आरव करिती
पृष्ठावरच्या जलवलयांना दूर क्षण सारूनी
मोडत होत्या अगणित लहरी कोठे फेसाळूनी
सोनेरी कर लहरीवरनी फेकुनिया रविराज
जाता जाता इन्द्रधनूचा चढवी सुन्दर साज
तरङ्गिणीने हार गळ्यातिल तरङ्ग – मणिमोत्यांचा
मावळणाऱ्या रविस अर्पुनी गौरव केला त्याचा
हिरे, माणके, पाचू, मोती गळले जे त्यातून
जळात पडले, किरणावलिच्या सप्तरङ्गिं चमकून

किरण कोवळे अस्तगिरीच्या सूर्याचे हासून
परत चालले होते 'गेला ग्रीष्म !' असें साङ्गून
गवत वाळलें कोठे, कोठे हिरवळ हासे रानीं
मञ्जुळ पावा लहरे कोठे वर्षर्तूचें गानीं

वळीव पडता पाणी त्याचें चमके पानोपानीं
रविकिरणें तीं मोत्यें वेचित खेळत होतीं रानीं
केव्हा केव्हा झगडत होते वारा–पाऊस–ऊन
थण्ड गारवा मधेच झोम्बे अङ्गा वाऱ्यातून
हसवि सकाळीं, ताप दुपारीं देई रवि सृष्टीला
न्हाणुनि जाई प्रेमाश्रूंच्या करुनी परि वृष्टीला
तावुनि गेलीं, भिजलीं हिरवी काळीं राईरानें
शुभ्र काजळी ढग वावरती नटुनी वर किरणानें
शुभ्र ढगाच्या कृष्ण ढगाच्या अथवा नावेंतून
वल्हवुनी रवि किरणीं जाई व्योमसागरातून
कृष्णाकाठा ये ओलावा ओसरल्यावर पाणी
पानोपानीं जमलीं सुन्दर मोहक पिवळीं नाणीं

कुठे कुठे तर बहरुनि गेलीं रानफुले वळवानें
कोमल पल्लव वर्षर्तूच्या फूलले चैतन्यानें
अजुन मोगरामुखीं तजेला होता हिरवागार
लुटलें होतें जरि रसिकानीं त्याचें पुष्पागार
रुन्दट पानीं कुन्दवेल ही लवली नवभारानें
फिरूं लागलीं किरणे शोधित नव फुललेलीं रानें
जाई फुटली तरारुनी, ये बहर जुईला पानीं
ऱ्हळूच डोकावूनी बघती चविणी वर नयनानीं
डोलडोलुनी तटिच्या तरुंनीं पुष्पें वाऱ्यावरती
झुगारिलीं वर नील महालीं, येता भक्तिस भरती

वेलीवरले कळे कोवळे हसू लागले मन्द
नाचू लागे वाऱ्यामञ्जे मञ्जरि ही स्वच्छन्द

तरङ्गली वर पुष्पावरती फूलपाखरें सारीं
गुञ्जत फिरले भृङ्ग गायनी कमलाच्या कामारीं
हाय ! कुणी परि कमळकळीच्या हृदयावरि भृङ्गानें
प्राण सोडिला, म्हणून गेली कोमुनि ती शोकानें !
अधरा नव्हता अधर विलगला, तो जीवाचा नाथ
जळात पडला, गेला म्हणुनी झुरली अन्य मनात !
दर्शन झालें आणि लोपलें दृश्य मधु प्रेमाचे
तरिच पद्मिनी गाळी अश्रु, मूक राहुनी वाचे !
ओळख नव्हती जन्मापासुन मुळी मुशाफर पतिची
कमलिनीस पण शिक्षा होई वैधव्याच्या गतिची !
भुलवुन नेला चन्द्र जिवाचा कोणी आकाशात
म्हणून नलिनी मान टाकुनी पडली सरोजळात !
सौभाग्याची थोर सम्पदा देणारा रवि जाई
कोमेजूनी म्हणुनि जळावर मूर्च्छित झाल्या काही !
मार बैसता वळवाचा कुणि कळिका अस्फूट मूक
दीन होउनी पडल्या, राहुन पोटी जीवनभूक !
स्वच्छन्दाने नाचत होतें स्थिरचर सारे नटुनी
यापरि दुःखें भोगित होत्या काही, लागुनि झुरणी !
स्वैर भराऱ्या मारित होते जीव किती सुखशील
तळमळ याना काय कुणाच्या हृदयाची पाहील !

तापुनि गेलीं शेते, डोङ्गर, ओहळ रानें सारीं
गार जहालीं किञ्चित्, येता वर्षर्तूची स्वारी
आकाशाच्या सोनसागरीं वायुजळाच्या लहरी
तोडुन, होतीं जात पाखरें चाऱ्यासह माघारी
चालुन गेल्यावर खिल्लारें, सुकल्या रस्त्यांतून
गायपावलें जळे चमकलीं कोठे चिखलांतून
कोठे कोठे गोधूळीनें भरलीं होतीं किरणें
माळावरती कान उभारुन, चपळ पहाती हरणे
परत पातल्या शेतकऱ्याच्या मुली वेचुनी शेणी
निघती बाला, रानफुलांची गुम्फुत होता वेणी
कुणी वासरासवे निघाल्या, पाहुन कलला भानू
आतुर मेण्ढ्या बेंकारीती; गीत किती ते वानू !
डोङ्गरओढ्यावरी थाम्बलीं गुरें प्यावया पाणी
सुरेल त्याना शीळ मुखाने घाली प्रेमळ वाणी
गुञ्जे केव्हा वाऱ्यावरती मधुनिच मञ्जुळ सूर
पोर आरडे कुठे, वासरें उधळुन जाता दूर
घण्टानादें गोपाळाची खिल्लारें मोहून
घरा परतलीं मन्द पावलीं नुकतीं शेतांतून
वत्सल गाई पुच्छ उभारुन उधळत गेल्या पुढती
रोधी त्याना गोपाळाचा पावा परि सङ्गीतीं
थाम्बुन मार्गी, मुरडुन मागे, कान जरा फिरवोनी
लकेर ऐकुन पुढे उधळल्या क्षणात हुम्बारोनी
शान्त होउनी तरङ्गिणीवर वायू वाहे मन्द
शान्त जहाले कृष्णाजळिच्या लाटांचे निष्पन्द

सोनेरी कर हासहासले हसऱ्या लाटावरती
वाळवण्टिवर शिम्पाशकले किरणीं चम् चम् करतीं
घुमू लागल्या हसऱ्या लहरी अफाट जळपात्रात
वाटे कान्हा जलतरङ्गि या वाजवि मञ्जुळ गीत
लहर वायुची चुकून यावी एकादीच मधून
लकेर कानीं तीच पडावी झुळझुळती मोहून

घरावलेले तीच पाखरे देउळशिखरीं शिरता
किलबिल झाली सुरू पिलांची मुखिच्या कवळाकरता
'हू हू हू हू कुहू कुहू' हे आले शब्द वरून
घाटावरल्या शकुनेशाच्या सुवर्णशिखरातून
विशाळ गेले शिखर जरी ते वरती अस्मानात
शब्द नादले घुमले खाली कृष्णेच्या पाण्यात
शकुनेशाच्या कैवल्यपदा वन्दन करण्यासाठी
पाठीमागुन सुरडत येई पुढती कृष्णा निकटीं
मन्दिरास मग घेउन वळसा वहात वेगें जाई
फुलें, फळे, जळ, किरणें ओतुन शकुनेशाचे पायी
सुन्दर मन्दिर कौशल्याने कारागीरें कोणी
शिल्पकलेची बहार केली, घाटावर बान्धोनी
सोनेरी दारावर हासे गतवैभव भेसूर
काळवण्डले सौधहि वरचे लागुन ती हुरहूर
वरती दारातून पायऱ्या गेल्या होत्या थेट
खालीं कृष्णाजळास काही गेल्या द्याया भेट

शकुनेशाचे चरण धुवोनी रात्रन्दिन पाण्याने
चढत्या घाटाकडे पाहुनी वाहे ती डौलाने

विश्व रङ्गले किरणफुलांनी सोनेरी; जाताना
जिवाफुलाचे जीवन होता नेत परी रविगणा
झाडामधुनी समोरच्या तो कर सोनेरी तीन
नाचत आले लङघुन कृष्णाजळ, होऊनी लीन
एक करानें अपुल्या तेजें शिखराते चमकविले
सोनकमळ वर सायङ्काळीं तरि कां त्याचें मिटलें ?
तेज जरासे गळलें होतें दुसऱ्याचें लहरींत
लाटावर तें रमलें होतें रङ्गफुलें फुलवीत
मावळता कर तिसरा खेळे आणि कुणाच्या गालीं.
कारुण्याने कुणा तरुणिच्या वदना हा कुरवाळी ?
तारुण्याच्या तेजावर त्या सोनेरी कर खेळे
परि नवतीचा बाग करपुनी गुलाब सुकुनी गेले !
शुभ्र कळ्याचा फुलुन फुलोरा वदनीं एका काळीं
फुले तयाचीं चुरमळलीं वा सुकुनी पाण्डुर झालीं !
पिवळे गोरेपण फिक्कटले निराश कोमल वदनी
उमलुन सुकली शुभ्र कळी वा चाफ्याची ही झडुनी !
कृष्णकचाच्या चन्द्रकळेच्या काळ्या सायङ्काळीं
वदनचन्द्र हा कीं मोहरला तेजें फेकित पिवळीं !
दिव्य अप्सरा शापित कोणी वरुनी इकडे आली,
स्वर्गदेवता दीनमुखानें उतरे अथवा खाली !

हृदयाकर्षक पावित्र्याचें तेज मुखाला सेवी
कारुण्यानें हृदय परांचें पाझरवी का देवी !

एकामागुन एक पायऱ्या उतरूं लागे खालीं
किरण रवीचें चढूं लागलें वरति रमाया भालीं
सोनेरी कर एक खेळला करिंच्या कळशीवरती
नाचनाचुनी चमकुन चढला लाल बाङ्गडीवरती
हळूच गेला मग हृदयावर हितगुज ऐकायाला
प्रीतीच्या करपल्या कळ्याचा भावुनि करुण उमाळा
तेथुन चमके गळा एकल्या निळ्या गळसरीवरती
अधर विलगुन बोलायाला जरा चमकला वरती
मूक मनाच्या मुग्धपणाचे मनात विरले बोल
म्हणून चढला गाली घ्याया चाफेकळिला डोल
चञ्चल पाणी चमकत होते विजलीचें नजरेत
अनुकम्पेने जाता गालीं होरपळे बागेन
उतरुन गेली एक पायरी तरुणी तो निमिषात
कर चमचमला वर भालाच्या उदास सौन्दर्यात !
परन्तु नव्हता सौभाग्याचा तिलक सतीच्या भाली
हाय—! म्हणूनी शोकावेगें किरण आदळे खाली !

दृष्टी ठरवुनि धरणीवरती एकविचारीं दङ्ग
थबकत चाले,समाधिचा वा न कळे होई भङ्ग

एकच होता विचार घोळत कोमल मुग्ध मनात
बावरलेलें धावत होते अथवा मन सैराट
असेल दिसलें हृन्नयनाला भूतकाळचें चित्र
वर्तमानच्या जाचणुकीचें अथवा अन्य विचित्र
भाविकालच्या नैराश्याच्या भेसुर अन्धारात
आशातारांकिरण चमकला नसेल वा हृदयात
खळबळ हृदयीं कसली झाली, ठाउक एका देवा !
करुणाश्रू हा पण गालावर ओघळुनी का यावा ?
आला दुसरा, हा तिसरा; परि वायूवाचुन कोण
अनाथ अश्रू ओघळलेला प्रेमे टाकी पुसुन !
कडेस वाहुन घागर दिनभर होती आता थकली
वदनावरती घर्मबिन्दुची माला किति डवडवली
मन्द पावलीं मधेच टाकी एकादा सुसकारा
भालावरल्या घर्मबिन्दुंना घेउनि जाई वारा
काळे कुरळे बाल बाजुचे वाऱ्यावर भुर्भुरुनी
हवेंत होते तरङ्गुनी वर, कमळीं भुङ्ग्यावाणी

सोनेरीवर सोनेरी कर सूर्यानें सोडून
कनकाची द्वारका वसविली पिवळ्या किरणातून
घागर घेउन हलु उतरे ती कृष्णेच्या पाण्यात
पायामधुनी शब्द नादले ‘ खळ ! खळ ! ’ एकान्तात
ठेवुनि कळशी घाटावरती, घागर घेउनि हातीं
जळांत वाकुन बुडवूं लागे धरुनि जराशी कलती

बुड्‌ लागली बुड्‌ बुड्‌ बुड्‌ बुड्‌ घागर शब्द करीत
दृष्टी उचलुन तों ती पाहे सहज समोर नदीत
मधुर मनोहर लाटावरुनी सर सर सरकत पुढती
चञ्चल दृष्टी क्षणात गेली, ठरली कृष्णाकाठी
दृश्य कोणते मोहविणारें मग दिसले नयनाला!
काय पाहिले! दृष्टी खिळली सतिची का काठाला! १७६

---

पाकळी २ री

# देशभक्तीचा मन्त्र

पुरा कडोसा पडला नव्हता ! किरणे सुन्दर पिवळीं
नाचत होतीं पिकावरोनी रानीं मायङ्काळीं
हाकित होता मोट अर्जुनि ही शेतकरी शेतात
दोराखालीं चाके होतीं किरकिर शब्द करीत
चुचकारोनी मधुनच कोणी राजा–सरदाऱ्याला
खड्या सुराने गाणे गाई थकवा घालविण्याला
वहात होतें झुळझुळ झुळझुळ पाटामधुनी पाणी
डोलत होतीं पिकें शिवारीं वाऱ्यावरती फुलुनी
घरास वळलीं गुरे थाम्बलीं कृष्णावाळुवटींत
माती उधळुन कोणी होतें डरकाळ्या फोडीत
पाणी पिउनी नीट घराला गेल्या काही गाई
गवत कोवळे खाया कोणी गाटी तटिंच्या मळई
पाङ्गुनि गेलीं हीं खिल्लारें आणाया वळवून
धावधावुनी गोपाळाचा गेला जीव दमून
मळईमधल्या शेङ्गा घेउनि हातीं ढगरिवरू
पहात होता मौज खालची तरुण कुणी हासून

मर्दपणाची मोहक जादू विलसे वदनावरती
विद्वत्तेची नवी तरतरी भालीं खेळत होती

अधरावरती लिहिला होता देशभक्तीचा भाव
गालावरती रङ्गत होता प्रेमाचा नव डाव
कारुण्याचें पाणी होतें तेजस्वी नयनात
दूरदृष्टिची नजर विजेची भरली होती त्यात
पावित्र्याची लहर तनूवर चमके तेजःपुञ्ज
अभिमानाचा फुलला होता तीवर सुन्दर कुञ्ज
विशाल वक्षस्थलीं विराजे औदार्याचा भाव
देशभक्तिचे निशाण आला फडकविण्याला राव
नव्या मनूच्या सुधारणेचा शिलेदार हा शूर
जुन्या रणावर गाजविण्याला येई नवी समशेर

हळूहळू मग गुरे धराला गेला दृष्टीपुढलीं
अस्तरवीवर टक लागूनी वृत्ति तयाची रमली
' बिम्ब चालले खाली, होइल अस्त अता सूर्याचा
चराचराला हाय ! दरारा बसेल अन्धाराचा ! '
अशा विचारीं जीव रङ्गला, तों दिसला डोळ्याला
महाराष्ट्र – सौभाग्य – रवीचा अस्तकाल झालेला !
इतिहासाच्या गतस्मृतींनी भरून अन्तर आले
नैराश्याने मग अपुल्याशीं शब्द दोन तो बोले–
' ती आर्यांची दिव्य संस्कृती गेली जगजाहीर !
कृतिची झाली माती ! गेले थोर कवी शाहीर !
भगवा झेण्डा गेला ! गेला जरिपटका पाताळीं !
भारतभूच्या आता न कळे आहे काय कपाळीं !

शूर वीरही गेले हिरवे, दगडाच्या छातीचे,
नाव कशाला रायगडाचें अथवा सिंहगडाचें !
पुरन्दराचीं, प्रतापगडचीं घेऊन आम्हीं नावे
पोवाड्यांतुन पोकळ आता बोल फुकाचे गावे !
काप जाउनी भोकें उरलीं ! जाउनि जीव शरीर !
दुर्दैवाचीं रडकीं गाणी कुठवर ही गाणार !
रसातळाला धर्महि गेला ! अभिमानाची चाड
नसे जराही; परसेवेला जपतो जीवापाड !
ग्रहण लागले धर्मरवीला; आले शाब्दिक थेर
धर्म बिचारा झाला केवळ रूढीचें माहेर !
बन्धन सुटलें नीतिबलाचे ! करुणा जाय लयाला !
बन्धुभावही प्रेमळ आम्ही, हाय ! कसा घालविला !
स्वराज्य गेलें ! स्वधर्म गेला ! समाजनीती गेली !
नको रडूं गे भारतमाते ! दीन अशी तुज केली ! '
टप्‌कन गळलीं दोन आसवें भरल्या डोळ्यातून
भारावूनी भंवती पाहे तरुण जरा दचकून
' काय करावें देशहिताचें कार्य ! ' पुन्हा हा मन्त्र
वाऱ्यावरुनी पाण्यामधुनी घुमघुमला सर्वत्र

झरझर गेला क्षणात उतरुन डगरीवरुनी खाली
मन्द पावलीं पुढे चालला पाहूनी भंवताली
एक विचारीं विचार खिळले, समरसलें मन त्यांत
देशभक्तिच्या अभिमानाच्या नीतीच्या वेडात

‘ स्वदेशसेवा विद्वत्तेला पूर्णत्वातें नेई
सेवेकरिता थोरमनाची तरीच तळमळ होई
समाजसेवा होईल जीवा; काय फुकें बोलूनी,
माया उमळे काय मनीं कधि नक्राश्रू गाळूनी !
कर्तव्याच्या रणाङ्गणावर मरणें देशाकरिता
हाच जिवाचा मोक्ष; योग्य हे गाणे मरता मरता
निःस्वार्थाच्या पानपतावर नच आम्ही लढणार
जरिपटक्याला विश्वावर मग कोण कधी घुमणार !
पावित्र्याच्या पानपतावर नच आम्ही लढणार
धर्मवीर मग भगवाझेण्डा कुठला फडकविणार !
वैधव्याच्या जोहागने नच आम्ही रडणार
तर भगिनींची हाक कुणाच्या कानावर जाणार ! ’
बोलत ऐसे बगाच गेला वाळवण्ट चालून
बोल बोलले तेच कोणसें वाटे वाऱ्यातून–
‘ तर भगिनींची हाक कुणाच्या कानावर जाणार !
तर विधवाची हाक कुणाच्या कानावर जाणार ! ’
शब्द नादले, पुनरपि घुमले, पुनरपि उठले नाद
वाऱ्यावरुनी पाण्यामधुनी घुमले मग पडसाद

मान उचलुनी वरती पाहे तो दृष्टीला काही
मोहविणारें दिसलें, म्हणुनी भरभर पुढती जाई.

---

## पाकळी ३ री

# कोण आलें ?

दृश्य कोणतें मोहविणारे मग दिसलें नयनाला !
काय पाहिले ! दृष्टि सतीची खिळली का काठाला !

कृष्णाकाठीं असता कोणी जवळी चतुर चितारी
रङ्गविलें मग असतें त्यानें चित्र असे मधु भारी–
‘ कीं घाटावर मन्दिर असुनी, वाळवण्ट शेजारी
मुरडुनि वाहे कृष्णाबाई बाजूला हसणारी
तरङ्गिणीचा तट सोनेरी दुसरा आहे दूर
अस्ता आहे सूर्य चालला वृक्षाआड समोर
रम्य वनश्री खुलली भवतीं; कमळतळ्याच्या वरुनी
चुकून आहे जात पाखरू एकादें किलबिलुनी
तरुणी कोणी पाणवठ्याला घाटावर आलेली
घागर घेउनि जळात आहे बुडवित धारेखाली
तरङ्गिणीवर तरळत आहे विहारनौका एक
लाटावरती वाऱ्यासङ्गें जाउनि झोक कितेक
वल्हें मारित तरुण बैसला आहे कोणी आत
समोर तरुणी वल्हें दुसरें मारी तरळ जळात
मध्यें आहे बाळ लाडका उभा मनोहर हंस
वाऱ्यासङ्गे भुरभुरताती काळे कुरळे केस
आणि पटावर चराचराच्या विश्वचितारी सविता
चतुराईनें रङ्ग बदलुनी, आणी चित्रा नवता’

वल्ह्यावर ती नौका नाचे कृष्णेच्या पाण्यात
बाळक पाहे खाली, ठेवुनि काठावरती हात
प्रेमानन्दें हासे पाहत तरुण भोवती खाली
लाटा वटल्या लाल तयाच्या तरुणीच्या मृदु गालीं
हालत डोलत नाचत नौका लाटावरती चाले
मोत्याचे सर कितीक खाली लाटावरती चुरले
नजर बैसली मग बाळाची खिळून लाटेवरती
हात पसरले खाली, घ्याया लाटावरले मोतीं
फेस जरासा आला जळिचा लाल चिमुकल्या हातीं
सोनेरी किरणात चमकले करीं हुर्मुजी मोतीं
तिथेच नाचत आनन्दाने द्याया ते आईला
बाळ लाडका लडिवाळपणें वळुनी हासत गेला
आईनें कर पुढती करिता, उधळुन देई मोतीं
चुरले सारे ते तरुणीच्या ताम्बुस गालावरती
वात्सल्याचा येइ उमाळा ! वल्हे ठेवुन खाली
हातीं कवटाळुनी लाडक्या चुम्बी हसऱ्या गालीं
पाहुनि, हृदया पूर पित्याच्या आला वात्सल्याचा
पोटाशीं धरि हसऱ्या बाळा, पापा घे गालाचा
सायङ्काळीं खेळ चालला प्रेमाचा नौकेत
घाटावरची तरुणी होती रमली पाहत तेथ
रमली होती दृष्टी लावुन एकजिवाभावाने
समाधिचा परि भङ्ग न झाला घागरिच्या शब्दानें
सुरम्य असलें चित्र रेखुनी सुन्दर कृष्णाकाठी
विश्वचितारी अर्ध मावळे आता पर्वतपाठी

विसरुन गेली स्वतास, पाहुनि चित्रें नौकेमधलीं
बुड बुड करुनी बुडती घागर बुडत चालली खाली
भान हरपले ! जीव रङ्गला सुखमय दृष्टिसुखात !
घागर सुटुनी तळास गेली करिची एक पळात !
जाणिव याची परन्तु नाही झाली क्षणभर तिजला
जळात राहुनि उभी एकली पाहे नौकालीला
घागर बुडली आणि पावला रविगणा अस्ताला !
रडुनी रडुनी लाली आली सन्ध्येच्या नयनाला
सौभाग्याची घागर बुडली काळाच्या ओघात
कमल ! तुला ये जाणिव याची कैसी बाळपणात !

नौकेमधली तरुणी कोणी चुम्बन घे बाळाचे
पाहुनि हें तर पाणी पाणी होय तिच्या हृदयाचे !
झर झर झरले डोळ्यामधुनी अश्रू गालावरती
टपटप गळलीं तीं मोलाचीं जळात माणिकमोतीं
' देवा ! दैवीं चुम्बन असलं कुठलं मज बाळाचं !
कुठलं नावेमधलं फिरणं ! भाग्य न या खेळाचं !
आस सुखाची आता कसली ! जीवित मातीमोल !
दैवावाचुन हाय, कुणाला लावावा हा बोल !
अशीच भगिनी सौभाग्याच्या सूर्याशी या बोल
प्रियनाथाशीं बोल सुखाचा बोल असा ग बोल
भुर्भुर उडुनी वाऱ्यावर हे कुन्तल येता वदनीं
सारितील हे नाथ प्रेमळ अपुल्या मृदु हातानीं

गुन्तुन जाता मोहनमाळा पाचूच्या हारात
हलक्या हातीं सोडवितिल ग हे प्रेमाचे हात
झुकली नौका ! कलली – परि छे ! ही त्यांनीं सावरली !
भवनौकेचे नावाडी हे असता भीती कसली ?
राजस हंसा, खेळ खेळ रे जीवफुलाच्या राजा,
फुलवन्तीला फुलवी–जाता ? मुखचन्द्रा, जा–जा–जा !
हाय ! चालला परतीराला, सगळे काय घराला ?
जा ! संसारीं असेच मिळुनी जा – जा परतीराला!
अभागिनीची स्मृति पण कोणा –!' डोळ्यांमधुनी ऐसे
विचार मनिंचे ओघळती हे, वाटे अश्रूसरिसे !

परतीराला उडवित गेली नौका प्रेमतरङ्ग
बघतां बघता कमल जाहली एक विचारीं दङ्ग
सन्ध्येच्या तेजाविण नुरलें तेजहि आकाशात
काळवण्डला दिवस जरासा भवताली निमिषात
सूर्य लोपला ! नौका गेली ! गेला राजस बाळ !
परि कमलेच्या दृष्टीवर तो खेळे अजुनी खेळ
गालावरच्या करुणाश्रूंनीं पदरहि भिजला चिम्ब
कल्पनेवरी तरळत होतें तेंच परी प्रतिबिम्ब
टी टी टी तों टिटवी कोणी टिवटिवली आकाशीं
दचकुन खाली बघता न दिसे घागर तिज हाताशीं !
घाबरली मग मनीं ! पळालें पुरें तोण्डचें पाणी
हताश झाली, जीव गळाला, झाली केविलवाणी !

' सासूवन्सं बोलुन घेतिल, घागर नाही म्हणुनी !
देवा, आता काय करूं मी ! बोले करुणावाणी
घळघळ घळघळ वाहत गेले नेत्रांमधुनी पूर
पाहू लागे इकडे, तिकडे, सभोवताली, दूर
जवळ दिसेना परन्तु कोणी माणुस आसोपास
भयाण शान्ती क्षणभर आली गभीर एकान्तास
सन्ध्यावायू अश्रु पुसाया मात्र एकला आला
तरुण कुणी तों–'कमल!' म्हणूनी मारी हाक तियेला.

---

पाकळी ४ थी

# परदेशाहून परत

अन्धारातुन शब्द कुणाचा परिचित कानीं आला !
डोळे वळले, कान लागले तिकडे ऐकायाला
वळून बघता कोणास्तव तरि होय मनीं आनन्द
निरखुन बघता कमल बोलली— ‘ काय ! कोण अरविन्द !’
‘ होय, तोच मी, कमल, बरं का ! ’ बोलुन हें हासून
उभा ठाकला वाळवण्टिचा तरुण पुढे येऊन
तों सन्ध्येच्या नवतेजाची छटा मनोहर लाल
फिक्कट, कमलाभालीं वठली पाण्डुर हाय ! विशाल
सौभाग्याचा तिलक न दिसला आणि सतीच्या भालीं
भाम्बवोनी गारठले मन, गात्रे त्याची थिजलीं !
‘ क - म - ल ! ’ म्हणूनी हाक मारिता गदगदल्या कण्ठानें
हृदयविदारक करुण फोडिला हम्बरडा गाईनें !
रडूं लागली दुक्खभरानें पदर लावुनी डोळा
शोकावेगे अरविन्दाचा जीव जाहला गोळा
फुन्दफुन्दुनी गहिवर दाटे, कढ येउन दुक्खानें
मुख झाकोनी करात फुन्दे अरविन्दहि शोकानें
‘ हाय ! अभागी झालें ! मेलें कायमची जन्माला ! ’
शब्द ऐकुनी हे तर थरथर कम्प जळावर उठला !

शब्द दाटले अरविन्दाच्या गहिंवरल्या कण्ठात
बघवेना हें म्हणून लपली सन्ध्या काळोखात !
क्षणैक जाता आवेगाची लाट जरा ओसरली
हृदयें झाली रितीं, अनावर दुक्खानें भरलेलीं
जागा झाली बोल अन्तरी ठेवाया प्रेमाचे
डोळे पुसुनी म्हणुनी बोले कमल सगद्गद वाचे
'केव्हा आला ? इथं कुणिकडं ? साङ्गा मज अरविन्द
कशास आला अभागिनीचा ऐकायाला शब्द !'
विचारताना हृदयामधुनी करुण उमाळा स्फुरला
डोळ्यामधुनी पुन्हा अश्रुचा ओघळ गालीं झरला !
'अघोर दुक्खाखाली चुरले कुणी कधी हें फूल,
कीं दुक्खानें पडली आहे मनास माझ्या भूल ?'
बोलुनि ऐसें सदय स्तम्भित झाला दुक्खावेगें
व्याकुळ होइल कमल म्हणूनी शोक आवरूं लागे
शोकावेगे दुक्ख तियेच्या मनास होइल फार
कर्मकहाणी तरि न विचारी तिजला तो दिलदार
'कमल, कमल ! तूं रडूं नको ग धीर मनाला देई
गिळून आता टाक मनींचें दुक्ख आपुलें, ताई
सुखी असावें तूं ही माझ्या एक जिवाची पूर्ती
दूर करावीं दुक्खें तव ही आस जिवाची मोठी
जीव लागला तुजवर, आलें नाही एकहि पत्र
परदेशीं मग तळमळ झाली; धावे मन सर्वत्र
सहा उन्हाळे गेले, कळला नाही तव वृत्तान्त
पाठविलेल्या पत्रालाही न मिळे उत्तर त्यांत

कालाच्या परि अशी प्रवाही तव दैवाची नाव
उलटी झाली, ठाऊक नव्हतें ! कमल, झुरे तरि जीव !
शिक्षण झालें, परदेशाहुनि काल इथें मी आलों
हेंच ऐकिले, भेटाया जो आतुर कमल, जहालो
त्यात, अजोळीं माहेराला, कळलें, तूं गेलीस
सुचे न काही कालपासुनी, जिव हो कासावीस !
बाळपणाच्या हवेंत आलों म्हणुन मना निववाया
सायङ्काळी काठाने या आलो सहल कराया
सहज पाहिले तुजला, झाला भास तुझा ग म्हणुनी
भेटाया तुज इकडे आलों वाळवण्ट तुडवूनी
परन्तु होते नशिबीं बघणें तव या दुर्दैवाला,
हृदयावरती निष्ठुर किति गे वज्रपात हा झाला !
बरं, कशाला आली होतिस घाटावर यावेळीं
निश्चळ होतिस कुणीकडे ग पाहत सायङ्काळीं
नेत्रामधुनी चालत होते तव की घळघळ पूर !
कसली होती मना लागली कमल, तुला हूरहूर !
डोळे पुसुनी बोले बाला— ' उशीर झाला फार !
बसतिल आता घरी बोलणीं, घाव जिव्हारीं घोर
साङ्गिन सारी कर्मकहाणी केव्हातरि तुम्हांस
कृपा करा ही मजवर, न तरी बसेल जीवा फास
घागर बुडली इथं, काढुनी देता का अरविन्द !
बोलुनि घ्यावे लागतील मज नाहि नाहि ते शब्द !
काय करूं मी ! कृपा एवढी करिता का मजवरती !'
परन्तु होता सिद्ध कधीचा ऐकाया तो विनती

धरणीवरचा देखावा हा पहात होत्या कोणी
उदास तारा आकाशाच्या नीळ महालातोनी
चमकत होता शुक्र अम्बरीं निजकिरणानीं शान्त
साण्डत होतें तेज जरासें कृष्णेच्या पाण्यात
कपडे काढुन बुडी मारिली जळात अरविन्दानें
शान्त जाहलें क्षणभर सारे जळिंच्या आवाजाने
धडधड आली मात्र एकली तिज हृदयातिल कानीं
नकळे तिज की व्याकुळ झालों आपण थरकापानी
अधीर झाला जीव तियेचा, भ्याली त्यात जराशी
आनन्दाची त्यातच थडके लाट हळू हृदयाशी
खळबळ झाली जळात उठले लाटाचे पडसाद
घागर घेउन करात आला वरती तों अरविन्द
येउन वरती घागर ठेवी कमलेपुढती शान्त
मोद मनींचा मग मावेना अबलेच्या गगनात
‘ किति पण पडला त्रास तुम्हाला !’ वदे असे ती काही
तोंच वदे तो ‘ कमल , तुझा मी बाळपणीचा भाई !
मज एकेरी नावानें तूं सम्बोधाया व्हावे
नको गौरवूं मजला, ताई, उपचाराच्या भावे ’
हंसुन वदे ती ‘ चुकलं माझं ! नको मनाला लावू !
बाळपणींचा अरू, जिवाचा तूच एकला भाऊ !
उशीर झाला— लोभ असूं दे— घरास जातें आता
भेटुन जा पण पुन्हा, बरं का ! ’ वदली घागर घेता
घागर, कळशी जळांत बुडवुन कडेस, हातीं घेई
‘ येतें मी अं !’ बोलुन झणिं हें, चढुन पायऱ्या जाई.

## पाकळी ५ वी

# चित्रें दिसलीं !

अन्धारातुन अस्फुट दिसली दृष्टिस, तोंपर्यन्त
ओलेत्यानें पाहत राहे डोळे राहुनि [illegible]
पडूं लागली दाट भोवतीं काळोखाची छाया
डोळे फाडुन बघता, गेले यत्न तयाचे वाया
ढगात काळ्या चमूचम् करुनी लपते वीज ढगात
तशीच गेली कमला पुढती कभिन्न काळोखांत
कल्पनेंत मग वेडा रमला उभा राहुनी शान्त
हृदयामधल्या प्रेमाचें तें पाहुनी चित्र अनाथ
हात घेउनी हृदयाशीं तो होता नीट पहात
विचार आले, सरकत गेले, ठरले कितिक मनात
चित्रें दिसलीं रम्य मनाला भूतकालचीं तीन
बघता बघता त्यात रङ्गला वेड्यापरि तो दीन !

आठवलें मग, मनास दिसलें पहिलें अन्धुक चित्र
डोळ्यांपुढती रङ्ग रङ्गले अन्धारीं सर्वत्र
लहान दिसलें खेडें त्याच्या सभोवार निवडुङ्ग
वेशीवरल्या देवळांतला दिसला तों बजरङ्ग
वाट दिसेना सरळ एकही उन्च सखल मार्गांत
टोकें आलीं होतीं वरती खडकाचीं डोलांत

लहान होतीं घरें, अङ्गणीं कुम्पण कोठे कोठे
राखित होतें बाभळ–बोरी–आम्बे मोठे मोठे
परडी होती बिलगुन मार्गे शेजारीं परसात
कडबा रचुनी गुरें बान्धिलीं पलीकडे गोठ्यांत
सोप्यामधली शाळा दिसली प्रेमळ पन्तोजीची
विजार टोपी घालुन ये तों मूर्त कुणा बालाची
लहान होती तिथेच कोणी सुन्दर पोर हुशार
हळूच गेली जवळ, पाहुनी डोळे पाणीदार
ओळख झाली, जमत चालली गट्टी शिकतां पाठ
खूष होउनी पन्तोजीनीं थोपटली मग पाठ
कौतुक वाटे मनीं तियेला पाहुनि त्या बालाला
एकामेकाविणें गमेना करमेना एकाला
बालबालिका खेळ खेळले होउनिया साङ्गाती
कधी घरीं वा नदीतटाकीं शिम्पा वेचुन हातीं
हिण्डत होतीं रानोमाळीं खेळत गावदरींत
चार हिवाळे सुखात गेले खेड्यातिल सहलींत
जिवलग झालीं परस्परांना, एकामेकावरती
जीव लावुनी बाल-बालिका प्रेमें खेळत होतीं
प्रश्न विचारी कितीक बाला, बालक ही डौलानें
उत्तर देउन तुष्ट करी तिज अपुल्या प्रौढपणानें
निजकन्येचा जीव पाहुनी बालावर अनिवार
गरीब आईबाप अन्तरीं तुष्ट जहाले फार
दारिद्र्यांतिल जीवांना ही होती सोडवणूक
सुख संसारीं दोन मुलें हीं, जीवाचें कौतूक

निष्ठुर झाला परी पाचवा पञ्चप्राण हिवाळा
पित्यास हरिता बालेच्या, ये दया न कसली काळा !
धरून तियेला पोटाशीं मग बालक तिज कुरवाळी
अर्थहीन शब्दांनीं तिजला समजावी त्याकाळीं
गुलगुल गोष्टी करिता करिता बाल्यकाळ ही गेला
बद्ध जाहले भाव जिवाचे दृढतर निजहृदयाला
समरसले हृद्भाव, मिळालीं मनें न कळतां काही
काटा रुपता एका, पायीं रक्त दुज्याला येई
दुर्दैवाचा घाला पडला दुसरा बालेवरतीं
विझवुन टाकी विधि आईची प्रेमळ जीवज्योती
रडता रडता सागर गेले वाहुन डोळ्यातून
बाल-बालिका स्फुन्दत होतीं तरि अश्रू गाळून
आकाशाची कुऱ्हाड पडली दैव खेळता खेळ
प्रेमळ मामा नेई तिजला पाहुनि असली वेळ
झाली ताटातूट चिमुकल्या प्रेमाची निमिषांत
आजोळाला सोडुन गेला बाळ घरीं शहरात
जीब टाङ्गले, जीव पाङ्गले चार उन्हाळे दूर
चुकून नाहीं कधीं भेटली बालकास परि पोर !

‘ कमल ! तीच ना, हाय ! हाय ! तूं–’ पुटपुटुनी हे शब्द
जरा दचकला काकडलेला घाटावर अरविन्द

ओलेत्यानें उभाच होता दातखिळी वाजून
छातीवरतीं हात बान्धले होते घट्ट अजून

धावत होते परी कल्पनाचक्र किती मोकाट
चित्र रङ्गलें दुसरें स्मृतिचें काळोखीं तो दाट

बालक गेला घरीं आपुल्या एका मोठ्या शहरीं
चैन पडेना, दुक्खावेगें हृदयीं हाले लहरी
विसरावें परि मनात यावें जीवन खेड्यातील
कधीं कधीं तर खळले नाहीं पाणी डोळ्यातील !
आली एके दिनीं पत्रिका बालेच्या लग्नाची
आघात बसे वीज कडाडे जणुं कीं आकाशींची
आशा गेली, हाय, लयाला जीवानें धरलेली
हताश होउनि सुम्भ जाहली वृत्ती बावरलेली
रडुं कोसळलें असतें गळले बिन्दू भूमीवरती
परन्तु हृदया आवरून तो वाचूं लागे पुढती
‘लग्न साजरें होइल अपुल्या शहरीं दोन दिसानीं
‘राजहंस’ हे घेतिल बाला अपुली सून करोनी
लग्ना यावें बालेचा हा शब्द तुम्हाला लिहिला—’
चक्कर येउन पत्र गळालें ! शब्द न पुढचा दिसला !

शिव मङ्गल सावधान झालें ! शिरीं अक्षता पडल्या
तळमळ दाबुन पोटीं, त्यानें स्नेहाशी तिज दिधल्या.

गौरिहरातें पूजित होती एकान्तीं मग बाला
हळूच गेला तरुण कुणी तों तिजला भेटायाला

उठली बाला जवळ येउनी लडिवाळपणें बोले
शब्द फुटेना ओठातुन, मुख गोरेमोरें झालें
बोट ठेवुनी ओठावर तों तरुण जरा तिज दापी
अङ्गुलि लावुनि बोले भाला ' दैव फिरे न कदापी ! '
बोलायाचें नाही आता मागिल काही शब्द
झालें गेलें ! नान्द सुखानें तोच मला आनन्द
बोलुनि तिजशीं आनन्दें मग समजावी बालेला
परी न दावी भाव जरा ही हृदयाचा दुखलेला

भोजन करूनी वधूवराना सौख्यायू चिन्तून
घरा परतला परोपरीनें स्वमना समजावून
एक दिनीं मग अपुल्या सदनीं जेवायाला त्याना
आमन्त्रूनी स्नेहभरानें रिझवी हृद्भावाना
स्वागत करि तो आनन्दानें पतिचें बालेसङ्गे
दोन सुखाचे शब्द बोलता तरुणाचें मन रङ्गे
काढविलें मग छायाचित्र त्रैमूर्तींचें त्याने
सुखकालाची स्मृती जहाली दृश्य अशा चित्रानें
आणि एक दिन तरुणानें ते वियोगकालस्मृतिचें
चित्र तियेला भेट म्हणूनी पाठविलें प्रेमाचें
बाळपणींच्या प्रेमाची ही भेट करीं घेऊन
पाहत राहे बाला प्रेमें हृदयाशींच धरून
राहुनि बाला चार दिसांनीं आपुल्या गावीं गेली
परन्तु होतें समाधान कीं ' अपुल्या गांवीं आली '

अश्रु राहिले उभे लोचनीं निघतांना गांवाला
आवरिले परि दोघांनींही संयमुनी हृदयाला

कमल ! तीच ना हाय, हाय ! तूं–' पुटपुटुनी हे शब्द
पुन्हा दचकला थर थर कापत घाटावर अरविन्द

वाऱ्यासङ्गें धावत होतें मन गतकालाभवती
भडकुनि गेलें फुटकें तारू जणूं सागरावरती
भिरभिर त्याचें फिरूं लागलें मस्तक आकाशात
कल्पनेवरी चित्र रङ्गलें तिसरें अन्धारात

ऐन दुपारीं हमरस्त्यावर विशाल वाड्यापुढती
मोटर होती उभी, दाटली गर्दी तीच्या भवती
आकाङ्क्षेनें तरुण निघाला कोणी परदेशाला
अश्रू आले वियोगभावें परि त्याच्या नयनाला
लाल जाहले डोळे रडुनी कोणा आतेष्टाचे
मायेचें मन आत पाझरे कितीतरी आईचें
तरुणी कोणी स्फुन्दत होती तरुणाशीं बोलून
पाट जाहले दृश्य लोचनीं हृदयातें खोलून
' मङ्गल आशीर्वाद प्रेमें देतों, घेई बाळा
निज कार्याची कास धरी ' मग वदवेना जनकाला

' साम्भाळूनी जा अं ! ' बोले कुरवाळीत मुखाला
वात्सल्यें तों साठविलेला ये आईस उमाळा
' पाठिव मजला पत्र, बरं का ! विसरायाचं नाहीं !'
तरुणी कोणी बोलुनि तरुणा भरल्या डोळां पाही
'येतो बाबा, आई ! जा, जा, रडूं नका या वेळीं
पाठवीन तुज पत्र बरं का, कळविन वेळोवेळीं
नान्द सुखानें निजसंसारीं सौख्य सदा मानूनी
सुखी असावें तूं ही आशा एक जिवालागूनी
रडूं नको, जा, पदर लाविसी कशास हा डोळ्याला ! '
बोलुनि ऐसें रुमाल करिंचा लावी तो नेत्राला
डोळेभर मग सगेसोयरे मातापितरें पाही
पों पों वाजुनि वेगें पुढती मोटर निघुनी जाई

नौकेमध्यें निजून जाई तरुण कुणी परदेशा
सत्कीर्तीची कौशल्याची चित्तीं धरुनी आशा
जरा लागला होता डोळा गादीवर नौकेंत
तरळत होतें चित्त एकलें स्वप्नीं परि निद्रेंत
विस्कळुनी निज केश आरडे विधवा कोणी वाटे
भेसुर रडणें ऐकुन शयनीं ऊर तयाचा फाटे
स्वप्नीं अश्रू त्या दुक्खानें हातावर ओघळले
परि वाटेना खरें, कमलचें कीं तें चित्रच दिसलें !

कमल ! तीच ना हाय, हाय ! तूं–' पुटपुटुनी हे शब्द
गारठलेला तेथ निसासूं लागे मग अरविन्द !

टपटपली तों टिपे खालती भरल्या डोळ्यांतून
आणि टपकले थेम्ब टपोरे वरतुन गगनांतून
दचकुन येतां भानावरती नजर फिरे आकाशीं
लुकलुकणारी एकच तारा दिसली तों नयनांशीं
भरले होतें दाट ढगांनीं वरखाली आभाळ
थेम्ब वरसले वरतुन खाली क्षणात रानोमाळ
कपडे घालुन घरास गेला ऐकत जों अरविन्द
हवेंत उठले तों विधवांच्या किङ्काळ्यांचे नाद ! ५१८

---

पाकळी ६ वी

## मायजाल

सन्ध्या होती जात चालली तों मधु आलापून
गीत गाइलें मञ्जुळ कोणी, आलें वाऱ्यातून–

## उषास्वप्न

[ छन्द–अभिमन्यू ]

कोण तो साङ्ग । साङ्ग पाहिलास
जिवाचा मोहक उल्हास ॥ ध्रु० ॥

उषेला बोले । बोले चित्रलेखा
लाजवी रङ्ग तिचा स्वमुखा
पाहुनी खाली । खाली गोन्धळली
छटा मृदु गालावर खुलली
फुटेना शब्द । शब्दचित्र त्याचें
जिवाच्या प्रियकर जीवाचें
हेरुनी सखिनें । सखिनें हातास ।
धरूनी पुशिला तिज भास   कोण तो०

धरूनी धीर । धीर भोवताली
पाहुनी लाजत ती वदली–
अशी बाई निजलें । निजलें मी महालीं
झोपलें ! रात्र शान्त झाली

स्वप्न तों दिसलं । दिसलं मज गोड
नको ग बाई ! सोड, सखे सोड !
कशाला साङ्गूं । साङ्गूं, जीवास–!
सोड ग, व्यर्थच ती आस ! कोण तो०

काय तुज साङ्गूं । साङ्गूं स्वप्नांत
पाहिलें मूर्त मदनकान्त
महाली आले । आले बाई जवळी
मोहनी लोचनात भरली !
मञ्चकाजवळी । जवळी येऊन
भारिलें अमृत देऊन
मूर्त तों विरली । विरली, जीवास
फसवि तो नाथाचा भास कोण तो ! ०

सूर अर्धवट असले काही कानावरती आले
अङ्ग शहारुन तिजला हृदयीं कसेंकसेंसें झालें
विरह उषेला अनिरुद्धाचा घडला हें ऐकून
विषण्ण झाली, पुढे चालली ध्याउन काही ध्यान
मनांत बोले ' उषे, सखीनं चतुर तुझ्या ग काही
चित्रं लिहुनी ओळख त्याची काय पटविली नाही !
स्वप्नामधल्या विरहानं का व्याकुळ तूं झालीस
स्वप्न गोड तें रेखायाला साङ्गच चतुर सखीस
उषे, साङ्ग ग, अनिरुद्धाची तुजवर अढळ प्रीती'—
शब्द कुणाचा ऐकुन थाम्बे परि उम्बरठ्यावरती !

लाखोली तों कानीं आली सासूची आतून
लीलावन्तें तशाच आल्या पुढती सरसावून
‘ कशास आलिस वहिनी, इतकी लवकर गङ्गेहूनी
काम सम्पलं नाहि बरं का घरातलं हें अजुनी
उजेड आहे अजून ! यावं कीं नाही हिण्डून !
घागर कळशी यावी ना ग जगताला दावून !
खरंच कुणाला वाटे कीं ही करिते काम बिचारी
बाई कामा काय लाविली, म्हणतिल लोकं सारीं
कामानं ही इडं जाउनी मास राहिलं अङ्गीं
त्यांत काळजी जिवास मोठी, नाही साङ्गीवाङ्गी !
काळोखाची लाज जिवाला वाटावीच कशाला
उजेड आहे अकलेचा जर जवळ, घरीं येण्याला !
शर्थ जहाली ! तरी बरं मी बोलत नाही काही
दोन दिसाची वसती इथली कशास बोलूं मीही !
आईकरिता जीव तुटे हा म्हणून जों बोलावं
लाज आपणा अपुली म्हणुनी मूग गिळून बसावं ! ’

चुलखण्डाच्या पुढून उठली सासू सन्तापून
करीत फण्फण् आली, हाती उलथानें घेऊन
‘ कशास व्हावे मूग गिळाया, केली नाही चोरी
बोलूं नाही तोंच आपलं करते आहे भारी
लाज न जीवा ! घरांत नाहीं चित्तच काडीइतकं
खावं, प्यावं, हिण्डुन यावं मनास माने तितकं

रत्न पोटचं जाऊन, आलं खापर हें हाताला
लाज मनाची जरा जनाची वाटेना जीवाला
हौस जिवाला वाटत होती जगांत भटकायाला
कपाळ असलं फुटकं घेउन आलिस का जल्माला !
पायगुणाची सटवी ! केलं जल्माचं वाटोळं
अपुल्या दुसऱ्याच्या जल्माला झाली कर्दनकाळ !'
शब्द दुधारी बोलुन असले सासू ताररवानें
सन्तापाच्या भरांत फेकी हातातिल उलथानें !
ठेवित होती घागर खाली कमला, तों मारानें
वाहूं लागे पाय कोवळा भळभळभळ रक्तानें !
तोण्ड बान्धुनी मार बुक्याचा अबला सोशी, परि ती
अघोर शिक्षा मुकेपणाची हृदया कांपित होती !
देवा नाही न्याय अशाला कीं तव साम्राज्यांत
मूक मनानीं साङ्ग मरावें काय असें जगतात !

जेवायाला सासूवन्सें बसल्या पाटावरती
बसे भुईवर बाजूस जरा सुनबाई ही पुढती
समोर होत्या दह्यादुधाच्या चरव्या तूपहि लोणी
शिळी कोरडी भाकर ढकली परि ओल्या घोटांनीं
आजूबाजुस होतें सारें परि घेण्याची चोरी
दो डोळ्यांची भेट न झाली असुनि जणूं शेजारीं
खात राहिली ती अन्नाला, परि तें खाई तिजला
आस सुखाची वेडी म्हणुनी जीव तयावर जगला

करून झाकापाक घरांतिल अन्धाऱ्या खोलींत
जाउन पडली कमल एकली, निद्रा आराधीत
थकली होती पुरी, जिवाला नव्हतें चैन जराही
डोळ्यापुढती उभी राहिली चित्रें काही काही !
' पाण्यावरली नौका ' दिसली, दिसला ' राजस हंस '
मग आठवला वल्ह्यावरला ' तरुणीचा इतिहास '
' घागर ' दिसली बुडतांना तिज, आला तो ' अरविन्द '
कानीं आला गहिवरलेल्या कण्ठामधला शब्द
' छायाचित्र ' प्रेमळ दिसलें विवाहकालातील
कल्पनेवरी रमली, काही पुटपुटली त्यातील
मधुर मनोहर मूर्तीवरती खिळली सतिची दृष्टी
विश्व लोपलें, एकच दिसली प्रेमळतेची सृष्टी
पञ्चप्राणाची कुरवण्डी करी कल्पनेंतून
जीवाचा लय लागे, त्यावर गेलें चित्त रमून
सुखस्मृतींनीं वेडावुन तिज, केला हळवा जीव
व्याकुळ झाली ! मिटूं लागलें डोळ्याचें राजीव !
बघता बघता चित्र मनोहर तें जीवाभावाचें
झांपड आली; क्षणांत पडले करपाशहि निद्रेचे !

शिथिल जाहलीं गात्रें, थकलीं; वश झाली निद्रेला
वदनावरती थकवा होता अता पुरा आलेला
रात्र जाहली बरीच भिजलें कपाळही घामानें
रातकिड्याचा किर्र शब्दही चाले एकसुरानें

पहाट झाली, मञ्जुळ आले किलबिल विहगालाप
मूक जगाला वाचा फुटली क्षणात आपोआप
हातावरती गाल ठेवुनी कमला निजली होती
स्वप्न मनोहर तोंच तरळलें मिटल्या डोळ्यावरती
भास भासले मूक मनाला किती कल्पनेवरती
रङ्ग रङ्गले; जोड जिवाला मिळे मनाची पुरती !

वाटे, होती मधुर पौर्णिमा ! रात्र हसे चन्देरी
नटे नभःश्री पातळ नेसुन टिकल्याचें जरतारी
खुल्या मनापरि खुले चान्दणें शुभ्र पाण्ढरें भवती
फुलें रुपेरी शेल्यामधुनी हसली वृक्षावरती
डोक्यावरती शीत चन्द्रमा आला होता शान्त
सामसूम ही होय चहुकडे; झालें सर्व निवान्त
डोलत होती मात्र एकली धरणी वाऱ्यासङ्गें
आन्दोल्यावर विश्व झोपलें; कोणी नव्हतें जागें
नाहि म्हणाया मधेंच कानीं फडफड ये पङ्ख्याची
भिन्ताडांतुन घुबडाची वा वाऱ्यातुन टिटवीची
सान हासऱ्या चन्द्रकराचा कवडासा चोरून
फिरकत होता झरोक्यांतुनी एक, महालातून
महाल होता नव रंङ्गांनीं सुन्दर रङ्गविलेला
भिन्तीवरलीं चित्रें होतीं खुलवित आणिक त्याला
वस्तु मजेच्या कुणी माण्डिल्या मेजामेजावरुनी
दोन कपाटें भरलीं होतीं पलीकडे ग्रन्थांनीं

लटकत होता पुढे आरसा काळ्या मेजावरती
टाक दौत वा वजन पुस्तकें नीट ठेविलीं होतीं
मिणमिण तेवत होतें जवळी शामदान ही एक
अन्धुक पसरे उजेड त्याचा शोभावन्त सुरेख
कोट कॉलरी विजार कपडे होते खुण्टीवरती
छायाचित्रें लटकत होतीं अनेकपरिचीं वरती
बाजुस एका सुबक माण्डिला होता मञ्चक कोणी
मऊ बिछान्यावरती होती सुटली मच्छरदाणी
सैल बान्धुनी सडक आपुले कोणी काळे केश
महालराणी निजली होती; खुलवी पातळवेश
हातावरती मस्तक ठेवुन निजली होती शान्त
वक्षःस्थलिचा पदर जरासा ढळला होता त्यात
झरोक्यातले किरण नाचलें उघडया गालावरती
मन्द हासता किञ्चित् चमके गालीं, ओठी भरती

तरुण बैसला कुणि शेजारीं मऊ मञ्चकावरती
काळोखाची छाया होती अस्फुट वदनावरती
गाल हासरा पाहुनि उघडा प्रियकरणीचा त्यानें
वाकुनि निद्रेमधें चुम्बिला हळूच उन्मादानें
हात कोवळा लाल गोरटा घेउनि अपुल्या हातीं
किती काल मग ठरवी दृष्टी गालीं स्निग्धप्रान्तीं
विचार येता मनांत काही पुन्हा चुम्बुनी गाल
उठवूं लागे मारुनि अङ्गुलि गालीं किञ्चित् काल

जागी होउन तरुणी डोळे उघडी अस्फुट लाल
मान उचलुनी वरती पाहे ताणुनि नेत्र विशाल
'कमल, ऊठ ना !'–'काय बाइ हें ! केव्हा येणं झालं !'
लाजुनि उठलों आपण, ऐसें भासे मायाजाल !

---

## पाकळी ७ वी

# नौकाविहार

‘ बघतें मी हें काय ! खरं का ते आपण जीवाचे ?
स्वप्नामधले किंवा देवा, सारे भास मनाचे
अठवण झाली मुळि न घराची खरंच का जीवाला ?
सोडुनि जातां करुणा आली अगदीं कीं न मनाला ! ’
पदर सावरित बोलत आहों वाटे हें कमलेला
पुशीत असता गालावरचा ओलावा उठलेला.

‘ डोळ्यावरची झोप उडाली कमल, अजूनी नाही
गेलों नव्हतों सोडुन तुजला क्षणभर मी कोटेही
स्वप्न पाहिलें असशिल काही, जागी होई नीट
दुसरें तिसरें कोणी नाही, भिऊं नको, हो धीट
खरंच का हें ? किंवा बघतें अजून सारं स्वप्न !
मनास वाटे कुठं जायचं कायमचं सोडून ! ’
‘ वेडी कुठली ! सोड कल्पना स्वप्नामधली सारी ! ’
वळे कुशीवर कमल रमूनी स्वप्नांतिल संसारीं

‘ खरंच वेडी समजत होतें मनांत भलत काही
क्षमा करावी ! पुन्हा कधी हें समजायाची नाही. ’

हातीं धरुनी हात पतीचा टक लावोनी वदनीं
पहात होती कमल आपणा दैववान समजूनी
कर घेउन मग करीं आपुल्या बोले पति पत्नीला
‘ रात्र मजेची किती सुखाची वाटे ही जीवाला
पहा चान्दणें फुललें भवती, वारा वाहे मन्द
फिरावयातें जाउं लाडके, चल ग करुं आनन्द ’
‘ काय बाइ हें तरी बोलणं ! ऐकती ना कोणी
उलटुन गेली रात्र, न फिरके पाखरुं ही मध्याह्नीं ! ’
तरीच वाटे कीं एकान्तीं जावें दूर निवान्त
गोड बोल बोलून करावं अधीर जीवा शान्त ! ’
बरं नव्हे हें ! सासूबन्सं बोलतील मामांजी
वडीलधारं गोड बोलुनी राखाव ना राजी !
कुणी पाहिलं इकडं घेउन मजला जर जातांना
छे बाई, पण लाज वाटते ! इथच बोलावं ना ! ’
आस जिवाची पुरवायाला कमल, न तुजला हौस
व्यर्थ जिवाची तळमळ ! करिसी काय अशीच निराश !
बोल जिवाला लावुनि घ्यावा काय गडे अबलेचा
बरं चलावं ! ही येतें मी ! रुसवा सोडायाचा ! ’

हात सखीचा धरुन दुसऱ्या करिं काठी फिरवीत
तरुण फिराया गेला – दिसलें कमलेला स्वप्नांत
हासत बोलत बोल जिवाचे सुखदुक्खाचे गोड
कृष्णाकांठीं आलीं दोघें पुरवायाला कोड

शुभ्र चान्दणें फुललें, वाटे, कणाकणांतुन भवती
तरुच्या छाया पडल्या होत्या खाली बुन्ध्यावरती
झुळुक वायुची मधुनच येता सळसळलीं वर पानें
खळखळ काढुनि सूर गायनीं रमलीं ओहळरानें
जवळ जाहला दोन नद्यांचा सङ्गम एकान्तात
काव्य नादलें दोबहिणींच्या प्रीतीच्या बहरांत
कोल्हेकुइचा सूर हुकीचा आला शेतातून
ओरड आली मण्डूकाची बेसुर खडकातून
वाऱ्यासङ्गें खेळत होत्या पाण्यावरती लहरी
वाटे तिजला निशाचराविण निजली सृष्टी सारी

हात सखीचा धरुन आला घाटावरती तरुण
जरा थबकला पाण्यावरती काहीसें निरखून
मनासारिखें काही दिसता मनात किञ्चित् हासे
हात सखीचे दोहातांनीं धरुन बोले ऐसे –
‘ नाव पहा तर किती मजेची समोर पाण्यावरती
जाउन येऊं परतीराला वल्हवुनी गे हातीं !
शुम्भ अशी का उभी लाडके, रुसवा आला काय !
बोलुनि चुम्बी गाल; तिचाही झाला मग निरुपाय
गाल पुसूनी पदरानें मग बोले शब्द हळूच
‘ वेड कुठूनी मनांत भरलं आजच हें नावेचं !
भीति मनाला माझ्या वाटे, धडकी भरुनि उरांत
उजवा डोळा लवे ! वाटतं कीं आहे स्वप्नांत ! ’

‘ केली ना तुज जागी कमले, चिमटा घेउन गालीं ?
शङ्का आली मनांत वेडे, भीती वाटे कसली ?
वेडी अगदीं ! सोड आपुलें वेड ! ’ असें बोलून
घाटावरल्या नावेजवळी गेला तिज घेऊन
नाव सोडवी खुण्टविलेली, ओढुनि जवळी आणी
आपण बसुनी, आंत सखीला घेई हळुच धरूनी
वल्हें घेई एक, सखीच्या देई दुसरें हातीं
खळखळ झाली जळांत, सरली नौका वल्ह्यावरती
मौज वाटली मनास खातां नौकेवरला वारा
सौख्य जाहलें जिवास, फुलला आसमन्त ही सारा
फिरतां वल्हें वरति उडाले तुषारबिन्दू गार
थर थर काटा उभा राहिला महिरुन सर्व शरीर
तरुण हासतां चमक तयाची उठे सतीच्या गालीं
नाजुक वठली वा अरुणाची गालावरती लाली
नौका जातां पाणी तोडुन आला वरती फेस
किंवा आले तळांतुनी हे वर मोत्यांचे घोस
तुटलें पाणी मिळून जाई नौका जाता पुढती
अनन्त वलयें मागें उठुनी गरगर पाण्यावरती
असङ्ख्य दिसले चन्द्र हालता पाणी तरळ नदींत
चमक विजेची नाचत होती चन्द्रांच्या दृष्टींत
बोले तरुणी ‘ जीव सुखाचा घालुन मी दुक्खांत
खरंच वेडी समजत होतें भलभलतंच मनांत !
बघायचं का, डोलत चाले वल्ह्यावरती नाव
जिवास वाटे सूख गडे ना, आता तरि, साङ्गावं ? ’

‘ जिवास वाटे सूख परी ग आहे एक उणीव
सुखात काही उणीव काढी सखये, मानवजीव !
हसुन वदे ‘ मी बसलें येथें, तूं बसलीस समोर
परन्तु असता बाळ मधे तर होती काय बहार !
दचकलीस ! का अशी लाजशी ! कसली वाटे भीती !
सखिस विचारी करीं हनुवटी करुनि जराशी वरती ’
घोटाळून क्षणभर बोले ‘ मी - मी - मी - ती - ना - हीं !
का - य बरं मी ! म्हटल क-सली अठवण झाली काही !
मनात आलं काय बर ! मी बोलत होतें काय !
जाऊं दे पण ! विचारतें मी धरून इकडचे पाय—
सूख बघावं अरविन्दानं अपुल येउन येथ
जिवास नाही काय वाटल, बोलाव ना नाथ !’
‘होय, वाटलं जिवास म्हणुनी बोलविले सानन्द
परन्तु कमले, कोण बरं हें घाटावर !— अरविन्द !’

तों कमलेला घाटावरुनी टक लावुन बघणारी
अरविन्दाची नजर विजेची दिसली सुख देणारी

थाम्बवुनी मग जळात होडी उत्सुकतेने उठुनी
अरविन्दाला कमल खुणावी येण्याला हातानी
प्रियनाथाला वदे ‘एकदा मारावी ना हाक ! ’
शब्द तोंच ये ‘ कमल, नको ग वाटे मज हें ठीक ! ’
हातांनीं मग तिला खुणावी की ‘पाहुनि दोघास
जीव सुखावे; तुझ्या सुखाविण जिवास नव्हती आस.

सुखी बघाया तुजला आलों येथे मी चालून
नको, नको ग बरा इथे मी, विहर सुखात रमून!'
नाथ वदे तों ' खुणाविसी का दुरुन, नाव ने तीरा ! '
' ध्यानीं आलं खरंच नाही ' कन्हवि वदत अधीरा
खुणाखुणानीं बोलत होते कमला, पति, अरविन्द
सोसाट्याच्या वाऱ्याचे तों कानीं आले शब्द
नौका चाले परन्तु झाले वादळ येउन वारा
खळबळ झाली जळात मोठी बसूं लागला मारा
उठूं लागल्या लाटावरती लाटा वाटे घोर
डळमळली तों जळात नौका झञ्झावातें थोर
धीर गळाला, वल्हे पडलें करातलें झोतानें
मिठी मारुनी पतिस बिलगली कमला थरकापानें
धरुन सखीला एका हातीं वल्हें मारी नाथ
परी पालथीं नौका करि तों निष्ठुर झञ्झावात !
मिठी मारुनी एकामेका शेवटली कण्ठात
जळात पडली, अरविन्दानें उडी घातली त्यात !
बुडता बुडतीं खड्क लागला जोरानें पायाला
धक्का बसला ! जीव तियेचा झाला अर्धामेला !

दचकुन जागी होई कमला भाम्बावून मनांत
डोळे फाडून बघता लागे रडावया निमिषांत
कारण विरलें स्वप्न मनातिल, गेले जीवितनाथ
हृदय फाटलें, दुक्ख दुणावें, अबला होय अनाथ !

परि न कळे कीं पाणी नव्हतें तेथ नदीचें गार
पाऊस पडला कौलारावर त्याची गळली धार !
पाय चोळितां खडक लागला वाटे त्या वेडात
परन्तु न कळे कीं ' वन्संची ' बसली होती लाथ !
लीलावन्सें दिवा घेउनी आल्या उठवायाला
'ऊठ, दळावे दळण कुणी ! ' या बोलत मधु वचनाला !
म्हणून उठली; परन्तु होती रडावयाची चोरी
लीला गेली, रडूं लागली अन्धारांत बिचारी !

## पाकळी ८ वी

# पायदळी कळ्या

छायाचित्र स्वप्नामधलें स्मृतिफलकावर दिसलें
डोळ्यांमधुनी तों अश्रूंचे लोट तिच्या पाझरले !
दिवा लावुनी हळूच गेली एका पेटीजवळी
काढुनि छायाचित्र एक, घे करीं, बघुन भवतालीं.
एक मनानें, एक जिवानें दृष्टी त्यावर लावी
गहिवरुनी मग मनीं स्मृतीनें, बोले सौख्याभावीं –
' स्वप्न जाहलं जन्माचं हें, देवा, भास कशाला !
हृदयींचा मृदु भाव दुखावे ! लागे ओढ जिवाला !
कशास मजला हृदय दिलेंसी ! दुःखं जाणायाला !
भावभावना कशास देवा, देसी मूक जिवाला !
गोठ्यामधलीं गायबैल हीं सुखीं भावनेवीण,
मुकेपणानं सुखें राहतीं, बरवीं फार अजाण.
काम करावं गुरापरी, परि त्या न मुळिं जिवाला
गतकालाच्या भासाचे कां छळ लिहिले दैवाला !'
मनात यापरि बोलत, उठली हळूच डोळे पुसुनी
काम कराया घरात गेली कमल दिवा घेऊनी
फिरकत होती भिन्तीवरती छाया आत कुणाची !
स्थिरावली, तों घरघर आली कानावर जात्याची !
फुटलें होतें जरा ताम्बडें आकाशीं पूर्वेला
पक्षिगणाला साथ कोम्बडा द्यायातें आरवला

बोले झाडावरी पिङ्गळा किल्‌विल् मञ्जुळ बोल
' वासुदेव ' कुणि अलगूजातुन गाई गीत सुरेल
सूर्य उगवला, किरण फाकले ओल्या सृष्टीवरती
दळून उठली दळण, पुसूनी कपाळ पदरानें ती
कामें वरलीं करून झालीं ! उठल्या सासूबाई
कामावाचुनि बोलण्यातली होती मग चतुराई !

फुलें न दिसलीं तों कमलेला देवाच्या पूजेला
म्हणून गेली घेउनि परडी पुष्पें तोडायाला
दूर नदीच्या वाटेवरती रम्य बगीचा होता
ओहळ वाहे भवती खळखळ खडकावर झुळझुळता
वळसा घालुनि फुलबागेला, भेटाया कृष्णेला
आनन्दे तो दुडदुड नाचत धावत खालीं गेला
कमला गेली मामांजीच्या प्रियकर फुलबागेंत
आल्या होत्या वेलीवरती कुन्दकळ्या बहरांत
वळवानें परि फुलें जुईचीं, प्राजक्ताचीं, भिजुनी
गळलीं होतीं वेलीखालीं सुन्दर मधुनीमधुनी
हासत होते पुष्पावरती आकाशींचे मोतीं
चैतन्याची नवी तरतरी खेळे वेलीवरती

कुन्दकळ्यांचा दाट ताटवा कलिकांनीं फुललेला
समोर पाहुनि, परडी घेउनि जवळी गेली कमला

डोलत होत्या वाऱ्यासङ्गें कलिका खालींवरती
हासत होत्या झोपाळ्यावर कोणी झेलित मोतीं
रविकिरणांशीं, लाजलाजुनी खेळत होत्या कोणी,
कुणी महालांमधुनी हिरव्या, हसल्या डोकावोनी,
रङ्गत होती मधुर कुणाच्या गालावरती लाली,
डोळ्यांतूनी परी आसवें कुणाकुणाच्या आलीं !
एकसुराचें खुल्या दिलाचें गाणें ऐकुनि कोणी
ओहोळाला फसल्या, कारण नव्हती 'गुड् गुड्' वाणी
खेळ पाहुनी जीव विसावे कमलेचा बागेत
कळी मनाची जरा फुलोनी आला जीव जिवात
तोडायाला कळी घातला हात तिनें वेलीला
तों वायूनें हिरव्या पानीं लागे डोलायाला

दृष्टी फिरली कुन्दकळ्यांच्या गोड फुलोऱ्यावरुनी
तशीच भूमीवर गळलेल्या फुलाफुलातुन रमुनी
मनांत बोले 'मुक्या जिवाना छळलं कोणी येथ !
काय जाहलं बोला किंवा सोडुन गेले नाथ !
वळवानं कां दशा तुम्हाला आली मातीमोल !
कोसळलं आभाळ ! कुणाला लावावा मग बोल !
वेलीवरती कुणीं फुलावं, कुणीं हसावं गोड,
हाय ! तुम्हांवर परी बसावी वळवाची ना झोड !
'पायदळी ग झालां तुम्ही' हें बोलून तुम्हांला
पायाखालीं तुडवी जग हें !-करुणा पण देवाला !

रडूं नका मी उचलुन घेतें प्रेमानं परडींत
देवापायीं तुम्हास नेतें,' वदे कळी उचलीत
तों डोळ्याला दिसले 'कोणी भृङ्ग तिथे भिजलेला,
मरून पडला होता कळिला चुम्बाया आलेला
वळीव सोसुनि वेलीवरती झुरलेली फुलराणी—
मेली होती तिथेच शोकावेगें हृदय फुटोनी
दोन उमलल्या मधुर पाकळ्या तो हा घाला पडला
भृङ्गकळीची मिठी कण्ठिची दिसली तो डोळ्याला
दिसली कसली – दिसलिच नाहीं– कारण डोळे भरले
पदरावरती थेम्ब अश्रुचे झरझरझर तों झरले !
करुणा आली, स्मृती जहाली कसली अथवा न कळे !
वेलीवरच्या परी कळ्याना कण्ठ दाटुनी बोले—

' दुर्दैवाचा झोका बसतां पायदळी का झाला !
नाहि बरं ! मी अशीच ठेविन हृदयाशींच तुम्हाला
' वाली नाही अम्हांस कोणी ! जग झालं शिरजोर—'
मनीं आणिता कशास बाई दुक्खद हेच विचार
रडूं नका ग अशा सयांनो ! दुःख भोगायाला
जल्म न तुमचा; चला चला ग देवाच्या पायाला
पायदळी या जगी जहाला चुरडुन पायाखाली
परि देवाजी धरिल तुम्हाला प्रेमानन्दें भालीं
पायदळी जग आज तुडवितं, भजतं पुढती त्याला,
खेळ जगाचा व्यर्थ तुम्हाविण; मोल न काय कळीला !

दिले जगाला कुणी मनाच्या कोमलतेचे पाठ ?
सौन्दर्याचा पेला भरला कोणीं कांठोकाठ ?
कुणीं सोडिला निर्मलतेचा विश्वावरति सुगन्ध ?
कुणीं दाविलं हास्य लाजरं विश्वाला आनन्द ?
मोहकतेची मधुर मोहिनी मोहविते कोणाची ?
नव्हे कळ्यांची – मग कोणाची लाली गालावरची ?
फुलं कळ्यांनीं, फळं फुलांनीं दिधलीं ना विश्वाला ?
म्हणुन वाटतां तुम्ही लाडक्या, प्रेमळ देवाजीला
देवाजीला भेटवितें मी; तुम्हांस नेऊं ना मी ?
देवाजीच्या पायावरलं निर्मळ जीवन नामी
नेऊं ना मी तुम्हास ?–बोला ' तोंच झुळुक येवोनी
खाली वरती कळ्या डोलल्या माना डोलावोनी

हळूच हसऱ्या कळ्यास बोले—' अल्लडपण हें गोड
जाउनि, केव्हां तरि वळवाची बसे तुम्हावर झोड
क्षीण कशाला जिवास देतां ? तुम्हांस नेतें आता
देवापायीं, जन दृष्टीला पायदळी कां होतां ? '
वेंचुनि होता, तोडूं लागे कळ्याफुलें परडींत
भृङ्गकळीच्या, कळ्याफुलाच्या वेडाच्या लहरींत
कळ्यांस बोले ' पायदळी ग तुम्ही जाहल्यावरती,
दृष्टि फेकतं कुणी कधी का प्रेमळ भूमीवरती ? '
मग मानेनें ' नाही ! नाही–' बोले, वाटे, कलिका
नकार कळिचा बघुन सतीच्या बसला हृदया चरका !

'– नाही ! कळिके ! नाही पाहत ! कुणिहि न येइ समोर !
पायदळी वर परी तुडवतं !–जग झालं शिरजोर ! '

' होय, जाइल कमल, अशांवर जग सारं शिरजोर–'
पलीकडोनी उत्तर आलें ! दचके कमला फार ! ११६

---

## पाकळी ९ वी

# गजरा ओघळला !

‘ होय, अशा अबलावर झालं निष्ठुर जग शिरजोर
आणि वाञ्छितं कीं भोगावं त्यानीं दुक्ख अपार ! ’
शब्द बोलुनी पलीकडूनी जवळी ये अरविन्द
क्षण घाबरली, क्षुणात झाला हृदयीं तिज आनन्द !
एकमेकासमोर होतीं उभीं राहिलीं तेथ
मधे ताटवा सुन्दर होता फुललेला बागेंत
कळ्या मनोहर तोडित हातीं कमला बोलू लागे
खेळत कळिशीं अरविन्दाचें चित्त रमे तिजसङ्गें
‘ इकडं येसी कसा अरू, तूं ! साङ्गितलं तरि कोणी—
साङ्ग मला हें आधी, कीं मी आहें येथ म्हणोनी ! ’

‘ दुक्ख पाहुनी काल तुझं, हा हळवा झाला जीव
तळमळ झाली कमल, मनाची भरली हृदयीं कीव
झोप न सरत्या रात्रीं आली; भडके मन हैराण
आणि पालथे कितीक घाली वाळवण्ट वैराण
चैन पडेना म्हणून उठुनी आलों आज सकाळीं
दारांतच ग तों लीलेची माझी भेट जहाली
विचारतां मज कळलं कीं तूं आहेसी बागेंत
भेटायाला म्हणून आलों कमल, इथंच निवान्त

बोलत होतिस काय कळ्याशीं ! कानीं आले शब्द ! '
दुक्खित नयनीं टकमक पाहे, थाम्बुन तों अरविन्द

क्षणैक जाता बोलूं लागे मुख करुनी गम्भीर
' होय, अशावर कमल, वर का, जग झालं शिरजोर !
कळ्याफुलानीं जरा फुलावं वेलीवर हासून
तों वाऱ्यानं वा वळवानं पाडावं झडपून !
पायदळी त्या समजुन पायीं तुडवाव्या जगतानं
सुकून जाता त्यास हसावं मेलेल्या हृदयानं !
सुधारणेची नवी रीत ही ! धर्माचा हा बन्ध
कीं दुसऱ्याच्या दुक्खामध्ये मानावा आनन्द !
कमल, कळ्या या मूक, माङ्गातिल कोणाला गाऱ्हाणीं
मूक मनाच्या हाय, चुरडती जगीं तुझ्या जर बहिणी !
कलिका – भगिनी तुझ्या – आपुलं कपाळ ताडुन हातीं
झुरणी लागुन अशा जीवनीं मनात करपुन जाती
' पायदळी या कळ्या ! ' बोलुनी जग डोळे झाकून
खुशाल जाई चालुन त्याच्यावरुन मनीं हासून
कुणी हसावं, कुणी फुलाव, झुरुन मरावं कोणी
पुरुषानं परि सदा हसाव, स्त्रीनं रडत बसोनी !
समाज नाही कीव कराया धावुनिया येणार !
असं मरावं कळ्याफुलानीं ! जग झालं शिरजोर !
तळमळ होते बघ हृदयाची, कळवळुनी मन भारी !
नसानसातुन सन्तापाच्या पहा उसळती लहरी !

दांत आपुले, ओठ आपुले, कुणास परि साङ्गावं !
अनन्त कार्ये दिसतीं नयना; वाटे, काय करावं !
धर्मबन्धनें, धर्मबन्धनें ! कण्ठशोष हा करुनी
घालविला सद्धर्म लयाला आम्ही वदणारांनीं
पारतन्त्र्यशृङ्खला बैसली पायीं पूर्ण खिळून
लाज न त्याची कुणा, चालते चैन परन्तु अजून
मर्द जाहले अबला; मग हा बोल कुणा लावावा
घर फिरतां हे वासे फिरती ! दोष कुणाला द्यावा !
तुम्ही मरावं, अम्ही हसावं, कमल येथला न्याय
कळ्याफुलांनीं कोमेजावं ! हीच आमुची माय ! '
लाल जाहलें अरविन्दाचें लोचन आवेशानें
शब्द न, ठिणग्या जणूं उडाल्या वाटे, सन्तापानें
गुम्फित होती गजरा हातीं ऐकत शब्द मधून
पालटले किति रङ्ग मुखावर येउन शब्दांतून
निश्चल झाली चित्रासम ती, हात थाम्बले खाली
डोळे आले भरून, त्यांतुन दोन आसवें गळलीं !

अरविन्दाचें दुक्ख करावं हलकें म्हणुनी कमला
काढुन दुसरा विषय लागली हासुन बोलायाला —
' शिक्षण झालं, परदेशाहुन येसी नीट घराला
पिवळं झालं सोन्याहुन हें, लागशील धन्याला
लगीन केव्हा करावयाचं मनांत आहे आता !
तुझ्या सुखानं हलकी होइल आईची किति चिन्ता !

संसाराला लागणार तूं बोल कधी, अरविन्द ! '
हिरवीं पानें तों सळसळलीं जवळ वायुनें मन्द

आणि बाजुला खुजबुज झाली काही वेलीआड
कारण लीला बसली होती चोरुन, पाहुन झाड
बसली होती परन्तु दिसलें कोणाला नच काही
दाट ताटव्यांमधून लीला ऐकुन सारें पाही

सन्तापाची लहरी गेली, परि न दिसे आनन्द—
मुखावरी; पण शान्तपणानें बोले मग अरविन्द
' कमल, सुज्ञ तूं कळतं आहे तुजला सारं काही
विचारिशी तूं, म्हणुनि साङ्गतों उत्तर याचें मीही
देश बुडाला, धर्म बुडाला, कर्ता नाही म्हणुनी
परकीयांनीं हिणवावं ग हीन अम्हाला गणुनी
कार्यें पडलीं अनन्त, कोणी वाली नाही त्यांना
दास्याच्या नरकांत वाटतं गोड परी सर्वांना
शिक्षण घ्यावं, दास्य करा., ही न जिवाची आशा
गेलों नव्हतों या आशेनं मुळींच मी परदेशा
एक जिवाची महदाकाङ्क्षा कीं काही कौशल्य
परकीयांचं आणुन, नुरविन भूमातेचं शल्य !
ऐक ऐक ही भूमी रडते रात्रन्दिन शोकानं
तळमळ होउनि हृदय फुटे हें दुभङ्गुनी दुक्खानं

पहा अश्रु हे शिवरायाचे स्वर्गामधुनी आले
रविकिरणातुन पहा चमकती तानाजीचे भाले
रामदास हे गोड बोलुनी फिरती विश्वावरती
धर्म कथाया नव्या मनूचा ' बोध ' घेउनी हातीं
भाकर कोणा पुरी मिळेना, धनी उपाशी राहे
कामकऱ्याच्या कष्टावरती भलता नान्दत आहे
जोहाराची चिता धडधडे बघ ही क्षितिजावरती
येती विधवाच्या किङ्काळ्या भेसुर कानावरती
साङ्ग, सुखाची आस धरूं मी कुठं, दुक्ख पाहून
करुण आसवें भूमातेच्या डोळ्यातील बघून
करीन आधी देशभक्तिचें कार्य, जिवा शमवाया
विचार पुढचा पुढं; कशाला विचार तसले वाया !'
आवेशानें बोले, थाम्बुन परि कमलेस विचारी
' दुर्दैवाची कथा ऐकिली नाही तव ग सारी !'
' काय कथूं मी कर्मकहाणी अभागिनीची तुजला
कशास घेसी शल्य लावुनी जिवास ! ' बोले कमला
पुन्हा थाम्बली – भरून आले डोळे; केविलवाणी –
कण्ठ दाटता हलक्यानें मग बोले अस्फुट वाणी
' परदेशाला गेल्यावर तूं, गेले महिने चार
आणि लोपलं सौभाग्याचं – कायमचं माहेर !
पुत्रशोक तो होउन – गेले मामाजी सोडून !
कण्ठित आहे – काळ आपुला – मी तेव्हापासून !'

‘ दुक्खाची पण छटा मुखीं तव पसरे अजुन अघोर !
आहे सारं नीट घरी, का झालं दैव कठोर ?
‘ नको विचारूं घरचं काही, चाले सगळं नीट !
पण जल्माचा मलाच आता आला आहे वीट ! ’
‘ शपथ गळ्याची तुला ! मनातिल साङ्ग कमल, ग सारं
मनात माझ्या भिरभिरताहे बघ भीतीचं वारं ! ’
‘ घालुं नको ही शपथ ! कथूं मी काय तुला अरविन्द !
आज ऐकिला लग्नापासुन एक सुखाचा शब्द ! ’
गहिवरुनी मग कर्मकहाणी साङ्गे अरविन्दाला
फुलबागेवर अश्रुजळाचा पाउस दुसरा पडला !
कथा जिवाची ‘ नौकेवरली, स्वप्नामधली ’ साङ्गे
हाल तियेचे ऐकुन आले नयनीं अश्रू वेगें
परन्तु साङ्गुन कथा शेवटीं पाउल दावी त्याला
उलथान्याचा घाव पाहुनी, घाव बसे हृदयाला !
दुक्खावेगे अश्रु गळाले, कमला मग समजावी
कोठे आहों, काय करावें भान न त्याच्या गावीं !
‘ नीचपणा हा ! जग मेलं का ! हृदय जळलीं सारीं !
शब्द सुखाचा दिला न कोणी दुक्खाच्या संसारी ! ’
सन्तापानें बोले, परि ` सर्व बोलणें फोल
आलें ध्यानीं, कारण नव्हता सत्तेचा हा बोल
‘ होता काही दुक्ख जिवाला साङ्ग मला निःशङ्क
तुझ्या सुखाची आस जिवाला लागे दिवस कितीक ! ’
या परि बोलुन भेटायाचें वचन पुन्हा देवोनी
निघावयाला सजे कमल तों वदली नेत्र पुसोनी

‘ देशभक्तिची आशा व्हावी पूर्ण सदा अरविन्द
देवानं यश उदण्ड द्यावं, पसरावा गुणगन्ध
ही आळवणी देवाचरणीं विनवुन नित्य करीन
तूंच अम्हांला भाऊ ! आम्ही तुझ्याच हातीं दीन !’
कोठे पाहे शून्यमनें तो, निरोपुनी मग जाई
दृष्टी लावुन निश्चलतेनें कमला पहात राही !

हळूच उठली लीला, हृदयीं भरला मोद विषारी
टाकुनि हलकीं चोरपावलें तेथुन गेली स्वारी !

दृष्टी ठरली तोंवर पाही, पुटपुटली मग शब्द
‘ देशभक्तिचं थोर तुझं हें हृदय किती, अरविन्द !
दुक्ख पराचं अपुल्या आधी सञ्चरलं हृदयांत
निःस्वार्थानं झाली तव या देशभक्तिवर मात ! ’
क्षणांत दचके तोंच पाहुनी अर्धा गजरा हातीं
विस्मित झाली, गोन्धळली, मग बोले अपुल्याशीं ती
‘ कशास केला बरं फुलां·ग गजरा बोलत नादीं
फुलं गुम्फिलीं उगीच ! नुरलें भान मुळीं संवादीं !
खरंच वेडी ! गुम्फण घालुन फुलं नाशिलीं बाई
चला घराला— ! ’ विचार भेसुर तोंच चमकला काही !
‘ घरास गजरा कशास नेऊं ? विचारलं जर कोणी — ?
बोलतील — छे — फुलं बरीं ! सर न्यावा हा ओघळुनी !’

सरसर गुम्फण सोडवून, करि फुलें क्षणांत निराळीं
दीर्घ सोडुनी सुसकारा तीं परडीमध्यें घाली

सर ओघळला ! सर ओघळले, आले वाहत गालीं !
फुलें घेउनी परडीमधुनी घरास कमला आली. ११४८

---

## पाकळी १० वी

# विधवेचीं फुलें

घेउनि पुष्पाञ्जलि वेलीची प्रेमळ कमला आली
दारीं पुष्पाञ्जलि सासूची परन्तु कानीं पडली –
' असेल गेली निलाजरी ही कुठं तरी मसणात
पाय टिकावा घरात कैचा चित्त न जर कामात !
करितें आहे बरं सासुचं रात्रन्दिवस झटून
आस सुखाची आता आम्ही करणं याजकडून !
बोलावं तर जगास दिसत फटकळ माझं तोण्ड
पोर जाउनी, गतकाळीची बसे उरी ही धोण्ड
कपाळ फुटल अपुल याची लाज न मुळिं जीवाला
काळवेळ का आहे नाहीं या असल्या जाण्याला
फिद फिद हसुनी असेल बसली कुठं चकाट्या पिटित
पाय पाण्ढरे दावायाला मेली जाय जगात
टाळुनि आली माहेराला, वाटोळं करण्याला
सासरचं, पण करुणा येइ न त्या मेल्या देवाला
खडा मिठाचा दुधात पड ग अपुलं खोटं दैव
सुखांत माती कालवुनी वर हसते हीच सदैव
पोर ठेवुनी नेली असती हिला–' थाम्बली तोंच
परि कमलेला माहित होती शब्दविषारी चोंच
सुनबाईला पाहुनि करि ती घरभर साऱ्या नाच
विनयवती ती मूक राहिली करी न बाचाबाच

बोलत होती खड्या सुरानें ती घालूनपाडून
परि दुक्खाला वाट मिळाली नच अश्रूवांचून

कळ्याफुलांची ओन्जळ भरुनी घाली जों तबकात
फणफणणारी क्षणात बसली तों परडीवर लाथ !
कळ्या साण्डल्या भूमीवरती, मार बसे हाताला
क्रोधें सासू शिव्या देउनी लागे बोलायाला –
‘ फुलं कुणाला ! पूजेला ? हीं देवाच्या पूजेला ?
विटाळलेलीं तुझ्या हातची ! सटवे देव न मेला !
कपाळ फुटलं तरी रहाशी अशी, न याची लाज
मिरवायाला जा वेणीवर घालुन याचा साज !
मरावयाला गेलिस आधी कशास फुलबागेत ?
मरतिस तर मी फुलं उधळलीं असतीं आनन्दात ! ’

मोवळ आली जरा ! टेकली भिन्तीवरती कमला
अश्रु गळाले, हा बाणाचा घाव जिव्हारी बसला !

/

‘ सासू मेली म्हणून भरल्या घरांत आता रडुनी
दे सासूवर विटाळलेलीं फुलं तरी उधळूनी
चमत्कार हा आहे बाई ! येतातहि काङ्गावे
किती चाङ्गलं करा, एक हें पण देवाला ठावें !

शहाण्यासुरत्या आपण, केलं आज काम भरपूर
उचला आता फुलं आपली, दमलां आणुनि फार !
धुणं घेउनी नदीस जा, हे करा तरी उपकार
पिण्ड खावया या; न वाळवा हडं आमचीं फार !'
मनांत काही, मुखांत काही, काही ओठावरती —
शब्द सोडुनी गेली सासू — कारुण्याची मूर्ती !

चुरडुन झाले तुकडे तुकडे परी तिच्या हृदयाचे
गहिंवरलें मन; कण्ठ दाटुनी कढ आले दुःखाचे
रडे नावरे; परी आंतले आंत दाबुनी कण्ठ
गोळा करुनी, कळ्या घेउनी, धरी नदीची वाट

जिवास बोले जातां जाता ' कशावरी तव आस ?'
मिळवायाचं काय शेवटीं मोहुन या जगतास ?
कोण विचारी तुला ? कशाला तळमळसी या देहीं ?
सोडुन जावं जगास का हें कधी वाटलं नाही ?
काय जगाचं होइल, मिळतां मातिस मातीमोल
जीवन असलं ? कीटक मरतां दुक्ख कुणा होईल ?
जहरी सोसुन घाव, कोणता स्वर्ग तुला मिळणार ?
पाप फळाला आलं अथवा कुणीं साधिलं वैर ?
केला भरल्या संसाराचा मागिल जन्मीं भङ्ग,
म्हणून झाला मम जन्माच्या रङ्गाचा बेरङ्ग !

बोल राहवी इथं कथाला, जीवा आता बोल
परन्तु लिहिले असतिल दैवीं भोगायाचे हाल!
कळ्यांस बोले 'तुम्ही सुदैवी होतां वेलीवरती,
परन्तु फुटलं कपाळ, येतां अभागिनीच्या हातीं!
गीत गाइलं असतं कोणीं मञ्जुळ फुलबागेंत
बसलां असता वेलीवरती खुशाल झोके घेत
लाथ बैसली तुम्हांस याची क्षमा करा ग मजला
नेतें मी पण देवाजींच्या पायाशींच तुम्हांला'

विचारार्णवीं लाट आपटे वेगें लाटेवरती
दृश्य जाहले तुषार नयनीं; किञ्चित् आली भ्रान्ती!

'विष कालवलं! विष कालवलं कोणाच्या सौख्यांत?'
'विष कालवलं' साङ्ग कुणाच्या देवा, मीं आशेंत!
'पाय पाण्ढरे!'—खरंच पाण्ढरे! करुणा परि देवाला
'पाय पाण्ढरे' म्हणून जाऊं नका सोडुनी मजला

कळ्याफुलांनो! विटाळलां का येतां विधवेहातीं?
विधवेचीं हीं फुलं, हाय! का म्हणजे केवळ माती?
'विधवेचीं हीं फुलं—' बोलती, म्हणजे देवा काय?
विटाळलीं हीं कुणीं, कधी? या कुणीं लाविला पाय?
दीनदयाळा! साङ्ग शिरीं तव कळ्या ठेविल्या मींच,
झुगारुनी कीं देशिल मानुनि पूजा माझी नीच?

डोक्यावरुनी फेकशील कां विटाळलेलीं खालीं —
विधवेचीं हीं फुलं — ! ' झणीं मग भानावर ती आली

अघोर सोसुनि घाव विषारी मनास आला शीण
परि भीतीनें भरभर गेली कृष्णेला चालून. १२३०

---

## पाकळी ११ वी

# लीलेची लीला

ऐकुनि, लीला नदीस गेली हळुच अन्य मार्गानें
कळलें नाही कुणास काही, जाता आनन्दानें
कान देउनी सकल ऐकुनी, पाही ताणुनि डोळे
पापी दृष्टिस भाव मनाचे दिसले सर्व निराळे
उत्सुक झाली मनी फार; हें साङ्गाया आईला
भरला कांठोकाठ विषाचा तिच्या मनाचा पेला
स्नान करूनी घरा निघाली माण्डे चुरुनि मनांत
मनिं पुटपुटुनी तोंच नदीला कमला होती जात
बोलत अपुल्याशींच काहिसें, चाले वेडी कमला
डोळे खिळले खाली, तिजला दिसली नाही लीला
'वहिनी ! वहिनी !' म्हणून हाका लीला मारी दोन
परन्तु गेली तशीच कमला, कारण नव्हतें भान
कमला गेली; हाय ! थाम्बली ओठ खाउनी लीला
डोळे फाडुनि पाही, उरला ताळ न सन्तापाला
लाल जाहली, डोळे फिरले, कांपूं लागे ओठ
जाणिव याची नव्हती म्हणुनी कमला गेली नीट
क्रोधावेशें मनांत बोले—'वहिनी, हा अपमान !
भर रस्त्यावर छान ठेविशी नणदेचा हा मान !
अपमानाची चाड न तुजला; ठेव परी ध्यानांत
जहरी नागिण जिवन्त आहे डङ्खायास घरांत !'

योलत काही असें, घराला स्फुन्दत लीला येई
रडूं लागली बळेंच, गेली भाम्बावुन तों आई

अर्धामेला जीव जहाला समजावुन आईचा
'काय जाहलं साङ्ग तरी !' या मारा करि मन्त्राचा
'झपाटली का कुणी भुतानं बाळ लाडकी बाई
काय जहालं साङ्ग तरी ना ?' विनवुन बोले आई
लीला बोले 'नको रहाणं इथलं ! सासर गोड
अपमानाची इथं कुणाच्या जिवास जर ना चाड !'
'काय जहालं साङ्ग तरी मज !' बोले प्रेमळ आई
रडूं लागल्या दोघी; यांतच होतें सारें काही !
तवा तापला पुरा पाहुनी लीला फुन्दुनि बोले
'जातें आई घरास अपुली, निवतिल म्हणजे डोळे !'
डोळे पुसुनी मग कुजबुजली आईच्या कानांत
'सर्व साङ्गतें – इथं नको पण – जल ग माजघरांत !'
उठल्या दोघी; आणि आइच्या कानाशीं लागून
सोडूं लागे थेम्ब विषारी ही नागिण डङ्खून !

'आई, साङ्गूं काय तुला मी एक, दोन कीं तीन
म्हणेल कीं जग 'ही वहिनीचं साङ्गतेच गाऱ्हाणं !'
सहन न होई जिवास, तळमळ करि हा जीव बिचारा
आहेसी तूं तोंवर आम्हां माहेराचा वारा !

घालुन पाडुन सदा बोलणं, याला काय म्हणावं
वाङ्ग्यावरती तेल वड्याचं असलं का काढावं !
ह्याड मुळीं तर जिभेस नाही लाज जगाची नाही
घास सुखानं खाउं न देइल तरणीताठी तुज ही
बोलायाची गोष्ट नव्हे पण ऐक साङ्गतें आता
असता भाऊ, काय वाटलं असतं त्याच्या चित्ता !'
नाव मुलाचें ऐकुन झाले नेत्र जरासे ओले
अधीरली पण ऐकायाला गान्धारी जी बोले
' गेलें होतें ' लीला बोले ' आता फुलबागेंत
तोडित होती फुलं वेलिची वहिनी अपुली तेथ
लपून बसलें होतें बाजुस एका वेलीआड
दृष्टिआड ग सृष्टी आई ! न कुणा त्याची चाड !
काय साङ्गु मी प्रकार तिथला – विटाळले ग डोळे
रडत आपुली वहिनी होती कारण बाई न कळे
तोडित होती कळ्या, हासुनी आला तों अरविन्द
– आला परवां म्हणे – जाहला वहिनीला आनन्द !
ठरलं होतं भेटायाचं, मला वाटतं तेथ
म्हणून आला पाहुन कोणी नाहीसं बागेंत
गेला अगदीं वहिनीजवळी थेटच मेला धीट
हात तिचा मग अपुल्या हातीं धरिला त्यानं घट्ट !
चुरूचुरू ती इथं बोलते तिथं कळी पण फुलली
' पाहिल कोणी – असं काय हें ! ' निलाजरी हें वदली
' साङ्ग जाहलें रडावयाला काय असें आम्हांला !'
बोलुन काढी रुमाल, लागे टिपें तिचीं पुसण्याला

धरिला होता हात आपुला अजूनही हातांत
वहिनी साङ्गे रचुन मनाची कागाळी धादान्त
शिव्या देउनी तुजला, साङ्गे भलभलतं मग काही
डोळे आले भरून, मजला ऐकवे न तें आई !
जग दिसतं हें तसंच नसतं ! शब्दाचा डोलारा
आई सारा ! दिवा न पाही पण अपुल्या अन्धारा
गुम्फित होती गजरा वहिनी कळ्याफुलांचा एक
तों वेणीवर फुलं खोविलीं त्यानं दोन सुरेख
हळूच हसली वहिनी गालीं, हासे मग अरविन्द
करीत होती निलाजरी हा आनन्दीआनन्द !
बोले वहिनी ‘ लगीन आता नाही का करणार ? ’
‘ पाहूं पुढचें पुढे ’ वदे तो ‘ तुजला का हा घोर !
आस जिवाची तुजवर –! ’ बाई, काय तरी हे शब्द !
टक लावूनी आणि तिजकडे पाहे मग अरविन्द
पाउल दावुन काय म्हणे ती, ‘ सासू छळते मजला !
पहा डागलं ! उभी जाळते, न्या मज माहेराला ! ’
‘नेइन तुजला लवकर कमले, सोडवुनी यांतून
बोलून असं निघे, तोंच ती ठेवी हात धरून
इतकं असतं तरी पुरवलं – नको साङ्गणं पुढलं !
नको विचारूं ग डोळ्याचं पाप पुरं ओढवलं
गजरा गुम्फुन दिला तयाला; भेटायाचीं वचनं
घेउन सोडी हात, जरासं मुख हिरमुसलं करून
मग – ओठां–नीं – ’ साङ्गवे न मज ! नको विचारूं आई
गा - ला - व - र - पण नको’ – विषारी शब्द बोलली काही !

कानाजवळी मुख नेऊनी आणिक साङ्गे काही
आणि टाकुनी थेम्ब जरासे जहरी, खाली पाही !

टकमक होती पहात सासू, डोळे झाले लाल
थेम्ब साठले रक्ताचे वा ठिणग्या केवळ जाळ !
थरथर कांपे ओठ, लागली लीला तों बोलाया
कृष्णावाटेवरची सारी कर्मकथा साङ्गाया
जरा भेटली वाटेवर तों मीच जाउनी जवळी
विचारलं कीं परत येउ का धुर्णी धुवाया सगळीं
आली आई, ग चवताळुन वस्कन अङ्गावरती
आणि पाडले घरे जिवाला ! भरली अङ्गीं भीती !
' अन्न मिळेना खायाला का म्हणून येथे आला
भाराभर हीं घेऊन पोरं छळावया दुसऱ्याला
सुरी एक त्या उरास, आपण दुसऱ्या आला, ठीक
पुरे कळवळा, चालू लागा ' — बोले शब्द कितीक
खण्डीभर मज तिथं बोलली, लाज काढली माझी
आलें का मी बोलुन घ्याया ? तरि नव्हतें ग राजी !
भाऊ गेला, बाबा गेले ! एक तुझा आधार
गेल्यावर तू कुठलं मजला माहेराचं दार ! '
रडूं लागली फुन्दफुन्दुनी पुरें आणुनी सोङ्ग
चढला पारा, चढूं लागला नाटकास मग रङ्ग !

सन्तापानें वेडी होउन खाई करकर दांत
नागिण आई दंश कराया चवताळून पहात

अभागी कमल !

फण्फण् फण्फण् करीत होती, कमला नव्हती तेथ
नाही तर ती मेली असती खाउन एकच लाथ

रडून हासत होती लीला आनन्दून मनांत
कीं वहिनीला दंश विषारी होइल नीट अशांत ! १३४५

---

## पाकळी १२ वी

# देवाच्या पायाशीं

आलें होतें नदीस पाणी पाउस पडुनी रात्रीं
थडकत होत्या कडेस लाटा जाउन वेगें पात्रीं
गरगर होते फिरत भोवरे गढूळ पाण्यांतून
तुडुम्ब भरुनी कृष्णा वाहे, गाळ तटीं आणून
वाहुन गेल्या मळया साऱ्या पैलथडी न दिसे ही
कृष्णाबाई दुथडी वाहे बोलत वाटे काही
चढलें होतें वर वळवाचें पाणी घाटावरती
कमला गेली धुणीं धुवाया, परडीं घेउन हातीं
घागर परडी ठेवुन खाली धुवावया ती लागे
'पाणि उडालें!' म्हणुन भरे तों कर्मठ कोणी रागे
शिव्या ऐकुनी दूर जराशीं जाउन त्यापासून
धुणीं धुवोनी जळांत लागे करावया ती स्नान
वस्त्र नेसुनी दुसरें, भिजवुन कळ्या जरा पाण्यांत
शकुनेशाच्या मन्दिरास ती चढून जाई शान्त
घेउन ताम्ब्या एका हातीं परडी दुसऱ्या हातीं
करुण दृष्टिनें कळ्या न्यहाळित चाले वरती वरती
करुण वचांनीं कळ्यास बोले 'दुक्ख सयानो, गेलं
शालुङ्केवर चला बसाया; तुमचं भाग्य उदेलं!
देवाचरणीं बसून आता मधुर स्तोत्रें गा, गा
दुक्खांतुन मज मुक्त कराया देवाजीला साङ्गा

विधवेचीं हीं फुलं पाहुनी करुणा येईल त्याला
शिरीं करिल तो तुम्हांस धारण; खरंच काळजी त्याला
सार्थक होइल जन्माचं, हें पाहुनिया हृदयाला
सूख वाटतं किती तरी मज तुमच्या बघुन सुखाला
पाहुन तुमचं दुक्ख जराशीं झालें होतें वेडी
क्षमा करा मज सहवासानं कळली तुमची गोडी
लाथ लागली क्षमा करा, पण साङ्गा देवाजीला
सुखांत ठेवी सासूबाइस, देउन दीर्घायूला– '
बोलुन यापरि हळूच गेली वरती नन्दीजवळी
ओतुन पाणी शिङ्गावरती पुजूं लागली भाळीं
अभिषेकाचा ब्राह्मणमुखिचा सिंहनाद तों घुमुनी
देवळांतुनी येउन पडला बाहेर तिच्या कानीं
चढून गेली दोन पायऱ्या, दोन आणखी आंत
पाय ठेवितां घोर जाहला एकच तों आकान्त !

' शान्तम् पापम् ! अब्रह्मण्यम् ! झाला भ्रष्टाकार !
धर्म बुडाला !' एकच आला आंतुन हाहाःकार !
' अनाचार हा काय ! न वाली काय कुणी धर्माला !'
उठले ब्राह्मण गर्जत सारे, एक पुढे तों आला
' लाज न वाटे जीवा बाई, आला आंत कशास ?
देउळ केलें भ्रष्ट आणुनी पापाची ही रास !
आला येथे का पाडाया देवाला उपवास !
फेकुन द्या तीं फुलें, न भाळे देव अशा विधवांस !

विटाळलेलीं फुलें कशाला, चला दूर व्हा आता !
चला दूर व्हा ! देव बैसला अशा न विधवाकरितां !'
खेकसला तों गुरव येउनी जवळी अङ्गावरती
अपशब्दानें सतीस दुखवी, परतुन येई मग ती
अपमानाचे बाण लागुनी विव्हळ फार जहाली
ऐकायाला शब्द न राहे, बाहेर क्षणीं आली !

अनाथहृदयीं घाव घालती एका पोटासाठीं
हर हर, देवा ! बरी याहुनी तुझ्या दारची काठी !

बाजुस एका बसून मुळमुळ लागे ती रडण्याला
काय जाहलें हृदयीं, तिजला येइ न बोलायाला !
येउन खाली रडूं लागली बसून एकान्तांत
हृदयामधला परी उमाळा झाला नाही शान्त
कळ्याकडे मग पाहुन झाला जीव तियेचा वेडा
रडे नावरे, त्यांत दाबतां होय घाबरा थोडा
' देवा, सोडव आता ! दाविसि कशास हे अपमान ?
शब्दसुरीनं कापावी का कुणि ही अमुची मान ?
नलगे जगणं ! नकळे आता, काय करूं तरि साङ्ग !
जिवास सोडुन करिसी तुटल्या आशेचा कां भङ्ग ?
खरंच का तुज नावडतीं हीं अभागिनींचीं सुमनं ?
कशास जल्मा अम्हां घालिसी मग ? हें नलगे जगणं !

‘ विटाळली हीं फुलं !’ घरीं वा दारीं एकच शब्द
सार्थ किती मज बोल वाटती अता तुझे अरविन्द !
धिक्कारावं तिज घरच्यानं, जगतानं, थोरानं
हलक्यानं ही परि तुडवावं पायीं अपमानानं !
अपमानानं काय जगावं अशापरी करपून !
कुठवर सोसूं हाल आंतल्याआंत, मनात जळून !
दोन आसवं गाळायासहि नाही का मज वाव
निर्मळ तूझ्या पूजेलाही काय येतसे भाव !
नको पाहणं मन्दिरातलं रूप तुझं जर देवा,
जळरूपाची करीन सेवा, तिथं न असला हेवा !
कृष्णाबाई आई माझी बाप, देव ती आता
येऊं वरती कशास, करि ती दूर मनींची चिन्ता !
भूदेवांनो, खुशाल गाउन धर्मांचे स्तुतिपाठ
धर्म जागवा, देउन आम्हा व्रतकर्मांचे पाठ !
कळ्याफुलांनो, हाल जाहले तुमचे माझ्या हातीं
चला ठेवितें तुम्हांस पण मी कृष्णाहृदयावरती !
बोलत उठली परडी घेउन आली उतरून खाली
आणि आंसवें नयनांमधली संयत मार्गे गेलीं !
तुफान होतें तुडुम्ब भरलें पात्र नदीचें रुन्द
नेसुन कोराण्टीरङ्गाचें पातळ चाले धुन्द
वियोगिनी वा कुणी योगिनी गम्भीरातुर चाले
भाव आतला हृदयावरती लाटांमधुनी हाले
जळांत जाउन उभी राहिली कळ्या घेउनी हातीं
मधुर लागली गीत म्हणाया कृष्णाबाईचें ती—

## कृष्णाबाईचें गाणें

[ जाति – मोहिनी ]

नमस्कार कृष्णाबाई घेई, पुण्य माते !
तूंच एक सर्वस्वाचें तीर्थ गे अम्हांतें ॥ धु० ॥

अमृत गोड भरलें पात्रीं तुझ्या वाहिनी हे
अन्तरात जळरूपानें देव तुझ्या राहे
मायभू तुला हृदयाशीं प्रेमभरें वाहे
तीच सुधा मज पाजूनी, अमृत करि जिवातें

पुण्यजळें वीराअङ्गीं थोर तेज आलें
पुण्यसन्तरसवन्तीचें भाग्य ही उदेलें
महाराष्ट्रभूमीचें तूं नाव धन्य केलें
मायपोट समृद्धीचें एक तूं अम्हांतें १४४०

घोट एक घेता अङ्गीं भरे दिव्य वारें
भावभक्तिच्या प्रेमाचें वेड लावणारें
लीन तुझ्या चरणीं होती अतां भाव सारे
चमक एक तव तेजाची सुखवि लोचनातें

गाणें म्हणुनी ओन्जळींतल्या कळ्याकडे पाहून
भावभक्तिचे शब्द बोलली हृदयीं भारावून
' फुलं अर्पितें तुलाच आई, तुझीं, तयांना घेई
पदराखाली झाकुन, आम्हां तूंच अनाथा आई !

सागरनाथाजवळी देई प्रेमें नेउनि यांना
‘ तुषारांतुनी न्या स्वर्गाला ’ विनवी हें लाटांना
देवमस्तकीं शोभतील या जगता जड झालेल्या
आनन्दानें फिरतिल नन्दनवनिं येथे दुखलेल्या
विधवेचीं हीं फुलं घेउनी आई कृष्णाबाई
कारुण्याचं तीर्थ जळातुन मम बन्धूंना देई ! ’
बोलुनि ऐसें पुन्हा चम्बुनी, कळ्या सोडुनी देई
लाटांवरुनी पुञ्ज तयांचा तोंच वाहुनी जाई
सरकत गेली लाटासङ्गें दृष्टी खाली खाली
कल्पनेंत मग लाटासङ्गें तीही वाहत गेली !
परन्तु गेल्या कळिका वेगें कुठे दूर वाहून
मनांत वाटे बोले कमला सुसकारा सोडून–
‘ कळ्या मूक या वाहुन गेल्या पाण्याच्या ओघांत
असंच जीवन अमुचं केवळ आहे ना जगतांत !

प्रवाह कमले, अखण्ड वाहे काळाचा हा शान्त
वाहुन गेल्या अनन्त विझल्या जीवज्योती त्यांत !
किती वाहतीं, किती वाहतिल मूक फुलें अबलांचीं
अनाथास परि इथेच मुक्ती देई विधि कायमची !

कळ्या लोपल्या, वाहुन गेल्या कोठे दृष्टीपार
भानावर ती येतां झालें तिजला दुक्ख अपार

खळबळ झाली मनांत काही, भरलें काही वारें
दाबुन टाकी कर्मभोग परि विचार मनिंचे सारे
घागर भरुनी जळात, घेई मग उचलून कडेस
ताम्बे हातीं, पिळे धुण्याचे घेउनि जाय घरास

सूर्यावरती तों आकाशी आली काही पटलें
जमूं लागले मेघ अम्बरी ऊन जरा फिक्कटलें
धावुं लागले भुतासारखे मेघहि आकाशांत
नभःसागरीं जळचर वाटे धावति वायुजळात
दाट सावली क्षणात पडली, सुटला वारा गार
लवूं लागले झन्झावातें वेलवृक्ष भरदार
कडाड मोडुन पडले खाली काही वर गेलेले
गगनीं गेला उन्च धुरोळा, लोट तयाचे उठले
गिरागिरुनी वर खालीं उठली पडली पिकली पाने
कळ्याफुलाचा सडा जहाला, उठलीं हिरवीं रानें
झोम्बुं लागले अङ्गा शीतळ जळकण वाऱ्यांतील
प्रळय पाहुनी कापूं लागे भीती हृदयातील !
दङ्गा, गोन्धळ, एक धुमाळी ! झालें जग बेताल
सोसाट्यानें क्षणात वाटे होइल सर्व निकाल
चराचराची उचल पाहुनी कमला भ्याली फार
घरास गेली क्षणांत पळभर विसरुन सर्व विचार

---

## पाकळी १३ वी

# विषारी खञ्जीर

कड् कड् कड् कड् वीज कडाडे वरती ब्रह्माण्डात !
घडघडले तों वृक्ष खालती मोडूनिया शेतांत
निर्झर काळे फत्तर फोडी, मेघ तसे फोडून
एक विजेचा लोळ पातला, भूमीवर वरतून
कडकडाट वर झाला गगनीं, हादरलें जग खाली
लोळ कुठेसा दूर लोपला जाळुनिया तरुवेली
मेघामधले थेम्ब खालती आले वाऱ्यावरती
मुसळधार तों पडूं लागला पाऊस डोक्यावरती
भ्याली कमला पण नव्हती ती कोठे वाटेवरती
भीतीनें या क्षणात न तरी मूर्छित झाली असती
कडकडाट ती नभिचा ऐकुन शिरली जों दारांत
वीज कडाडुन गडगडाट तों झाला दुसरा आंत !

लाल साकळे रक्त मुखावर सासूच्या रागानें
सन्तापानें शीर तटाटे भालीं आवेगानें
गरगर होते डोळे फिरकत सभोवताली दूर
क्रोधावेगें अधर थरथरे, उठुन मनीं काहूर
दांत करकरा खाखावोनी ओठ मधे चावून
मारी जहरी नजरेचे ती सायक भुवयांतून

लवलव जिभली मुखांत हाले, शब्द नादले काही
गडगडाट हा कसला म्हणुनी कापत कमला पाही
तोंच ऐकिलें —'सटवे, झालिस कैशी कैदाशीण !
आग कशाला जिवा लाविसी ! टाक अम्हा मारून !
छळावया का जल्मा आलिस ? करतिस थेरं थेरं !
सासू झालं काय, करण्टे, घरातलं पोतेरं !
काय अवदसा तुज आठवली, कुटली आकाबाई ?
कोळुन प्यालिस लाज अवदसे ! काय साङ्ग तरि बाई !
निलाजरे, का खाया घालुन दमलिस या पोराना ?
शब्द विषारी बोलुन छळिसी डाकिणि ! का तूं याना ?
कुलवन्ताच्या घरा बुडवलं असल्या वागवणुकीनं !
काळोखी ही पुरी लागली मेलीच्या हातानं ! '

भ्याली कमला ! क्षणभर टकमक तशीच पहात राहे
मनात हासुनि पलीकडोनी लीला चोरुनि पाहे

' गुल्गुल् गोष्टी आवडती तुज परक्याशीं बागेत !
सोङ्ग फुलाचं करून खातिस शेण असं का तेथ ?
कशास नांवा अम्हां काळिमा — गेलं, नाव बुडालं !
सटवे ! कैदाशिणी ! अवदसे ! काय तुला आठवलं !!
अरविन्दाचा हात धरूनी उठुन तरी जा आता,
प्रकार असले कशास चोरुन, लाज कोळुनी पीतां !

पाप नको हें बघणं ! सटवे ! उलथुन जा, जा रां–!'
धप्प वाजलें समोर काही, आणि नादलें भाण्डें !

जलाल होतें विष शब्दांच्या जहरी खञ्जीराला,
क्षणांत शिरतां हृदयीं, आंतुन चरचर कांपत गेला !!
शब्द ऐकुनी भोंवळ येउनि कमला पडली खाली
ऐकुं न आली तिजला पुढली सासूची लाखोली
डोळे मिटले कपाळ फुटलें, दारावर चेंचून
वाहूं लागे रक्त भळभळां, फेस मुखीं येऊन
पिळे धुण्याचे बाजुस पडले, कळशी गेली दूर
भडभड पाणी वाहुन, गेले दुसऱ्या बाजुस पूर !
फुटुन बाङ्गडया, लाल थेम्बही हातामधुनी आले,
निश्चल झाली कमला, लीला समजे परि हे चाळे !
गेलें साण्डुन पाणी ! भिजले लुगडें, चोळी, अङ्ग
परि सासूला सुनबाईचे वाटे सारें सोङ्ग
म्हणून आली फण् फण् फण् फण् करीत कमलेजवळी,
निर्दयतेनें कमरेमध्यें लाथ एक मग घाली !
घागर ताम्बे पिळे उचलुनी तशीच गेली आंत
कमलेवर ती शब्दशिव्यांची लाखोलीच वहात
लीला गेली तशीच ! मागें परि दुर्दैवी कमला
मूर्च्छा येउनि पडली, आली करुणा लव न कुणाला !

परि तोण्डाचा पट्टा चाले अजूनही आंतून,
लीला होती हांसत मनिंचा सूड असा उगवून !

जाता थोडा वेळ लागली कण्हावयाला कमला !
जरा हालली ! हात उचलुनी लावी मग डोक्याला
भिजला होता पदर, माखलें कपाळही रक्तानें,
मूर्च्छा आली क्षणात दुसरी मग रक्तस्रावानें !
निश्चल झाली क्षणभर घाली मुखीं न कोणी पाणी !
शब्द खोल ये परन्तु झाली तीही निश्चल वाणी !
गेले काही क्षण मग आली कमला भानावरती
हळूच डोळे उघडुन फिरवी इकडे तिकडे भंवती !
‘ कोठे आहों ’, ‘ काय जाहलें ’, ‘ कोण बोललें आत ’
कळे न तिजला, डोळ्यावरची निवळूं लागे भ्रान्त
हळूच लागे उठावयाला—नव्हती शक्ति उठाया
खचली होती कम्बर म्हणुनी पडली मग त्या ठाया
शब्द ऐकुनी कठोर आतिल मनीं आठवे सारें
तोंच हुन्दका कण्ठ फोडुनी आला अश्रुद्वारें
हळूच उठली धरून भिन्तिस, उभी राहिली नीट
खोलिंत गेली, परन्तु पडली तिथे येउनी झीट !

शुद्धीवरती येउनि कमला उघडी नेत्र विलोल
कण्हूं लागली ‘ पाणी ! पाणी ! ’ करुणरवानें बोल !
परी मिळालें पाणी ही नच बराच गेला वेळ !
अश्रु गाळुनी दुर्दैवाचा कण्ठित राहे काळ
काम्बळ्यावरी पडुनी, घेई क्षणभर विश्रान्ती ती
परि हृदयाची भङ्ग पावली होती आता शान्ती !

## अभागी कमल !

झरझर झरझर वाहत होते अश्रू डोळ्यातून !
कण्ठ दाटुनी रडावयाला लागे मनिं फुन्दून
जीव नकोसा झाला, विटली कायमची जन्माला
तहान मेली, भूक निमाली, आस नुरे जीवाला !
लीला येई बोलविण्याला– निमित्त टाळायाला !
दंश विषारी पाहुन, खाली जीव तिचा मग पडला
आली–गेली तशीच ! कोणी जवळी गेलें नाही
डोकें धरुनी मनात कमला बोले काही काही
ओघलळे सर गालीं झर झर एकामागुनि एक
'जगूं–मरूं !' या वेडाखालीं हलले मन लवचीक
दुःख मनाचे मनास टावे ! बोलाया येईना
तळमळ तळमळ तळमळ मनिंची हाय–पुरी जाईना !
भयाण भासे जग हे ! रडुनी सुजवुन घेई डोळे
वळुन कुशीवर कढ येऊनी मनात कमला विवळे !

देवा ! ऐसें मनिं हळहळुनी भगिनींनीं विवळावें,
आणि बन्धुनीं आम्ही शाब्दिक ध्येयातच मिरवावें !

•

पाकळी १४ वी

## कडयावर !

दुपार पुरती टळून गेली कलला रवि आकाशीं
वळीव सोसून झाली होती धरणी थण्ड जराशी
झरोक्यातुनी झुळुक येउनि किञ्चित देह सुखावे
ठणका लागुन तो कमलेचे क्षणात अङ्ग दुखावें
दुखू लागले डोके कलकल जखम जाहली घोर
साहवे न तिज पळभर आता मुक्या जिवाचा भार
काहुर उठले मनात, आले विकार कण्ठीं सारे
वाहत होते अश्रु जगाच्या दृष्टिस ना दिसणारे

भडकत गेले विचार कोठे, जीव नकोसा झाला !
घाव जिव्हारी बसता, जगणे गोड गमे न जिवाला !
लाल जाहले नेत्र विचारी फेकी भेसुर दृष्टी
एकच दृक्पाताने वाटे भस्म करी ही सृष्टी
सन्तापाची लहर भयङ्कर ! शब्दाचा खञ्जीर
भिडे काळजा लावुनि जीवा कायमचा परि घोर
थरथर कापे ओठ, दाटला हृदयीं थोर उमाळा
प्रेतावरती जिवन्त, पडल्या अश्रुफुलाच्या माळा !
फुटला कण्ठांतून शेवटीं सांठविलेला पाट
पडल्या जागीं रडून, देई निजदुक्खाला वाट !

लाट ओसरे; खाऊं लागे परि जीवाला शब्द
क्षणात चढला क्षणात विरला दुक्खाचा उन्माद
दुखूं लागली जखम जिवाची, डोक्याचीही फार !
व्याकुळ होउन करूं लागली अपुल्याशींच विचार
‘ सार्थक झालं जन्माचं ना जीवा ! आता काय
शोभा उरली ! जगात जगणं जिवन्त मरणं होय !
जगणं आता कशास ! नाही मेली पुरती आस !
दुर्दैवाच्या खेळामधले पुरे न का आयास !
मोह पुरे हा, पाप फळाला नच का पुरतं आलं !
पापी जीवा, जगास पाहुन नाही का मन मेलं !
भोग भोगले देवा सगळे पापे अपुली गणुनी
सोसाया परि शब्द दुधारी जगविलेंस का म्हणुनी !
हाल भोगिले असते काही अघोर या जीवानं
ऐकविसी का हाय ! हाय ! ते शब्द थोर वाणीनं
नाव बुडाविलं ! कुणीं बुडाविलं ! कोणाचं ! मीं केव्हा !
कुणा लाविली काळोखी मी ! कधी, कशाला, देवा !
सोङ्ग फुलाचं–सोङ्ग फुलाचं, कुणीं, कशाला केलं !
नांव कुणाचं साङ्ग बुडालं ! काय मला आठवलं !
अरविन्दाचा–हाय ! कशाला पुण्यवन्त तें नाव !
ऐकुनि, देवा, साङ्ग, साङ्ग, हें, काय जगात जगावं !
मरण योग्य ना जीवा ऐशा !– मरण गोड विधवांनां
जनदृष्टीचं जगणं केवळ मरण सदैव तयांना !
मोल जिवाचं माती ! माती जीवित-मातीमोल !
मातिस माती मिळवायाला होइ जिवा बेताल– ! ’

बोलत असतां मनांत भरलें आवेगाचें वारें
भेसुर दृष्टी फिरुन एकदां सामावी जग सारें
दात खाउनी, ओठ चावला ! निश्चय काही ठरला !
आवेगाच्या भरात उठली शक्तिहीन झणिं कमला

भरले अङ्गीं दुक्खावेगें मरणाचे नव वारें
डोक्यावरच्या जखमेचें मग दुक्ख विसरली सारें
उठली फिरली घरात, पाही चोरुन, निरखुन नीट !
भेसुर दृष्टी झाली, गरगर फिरणारी, मग धीट !

पेटीमधुनी चित्र काढुनी डोळाभर ती पाहे
निश्चलतेने एक निमिषभर अश्रू गाळित राहे
करात घेउनि छायाचित्र प्रेमे त्रैमूर्तींचें
पाठीवरती शब्द लिही ती भ्रमातले हृदयींचे
पाहुन डोळे भरून, ठेवी चित्र झणीं पेटींत
परन्तु येता विचार काही घे काढून करात !
काय वाटले देवा ठावें; पुन्हा ठेवि तें आंत
परन्तु निश्चित ठरता काही काढुनि घे हातांत
चित्र धरूनी हृदयाशी मग दृष्टी त्यावर लावी
परी कुठेशी निघे म्हणुनि ते ओच्यामध्यें ठेवी

घरात नव्हतें कोणी आता, सायङ्काळ जहाली
भाविक सासू उत्सुकतेनें देवदर्शना ( ! ) गेली

रुमाल घेउनि वीण शिकाया जेवण करुनी लीला
गेली होती कुणाकडेशीं वेळ तिलाही झाला
मुलें न अजुनी शाळेमधुनी घरा निघाली होतीं
गुरें परतलीं ! सूर्य उतरला जरा डोङ्गरावरती
शून्य घराला पाहुनि गेली वेगें ती परसात,
ओघळ पुसुनी झणि रक्ताचे, जाई मग परड्यात
अश्रु गाळुनी, शेवटचे मग घराकडे पाहून
निश्चयतेने मना आवरी मान झणीं फिरवून
भीत भीत मग मागिल दारी पहात गेली नीट
ठाउक नव्हते कोणा की तिज ये जन्माचा वीट !

मागिल दारातून निसटुनी वायूच्या वेगाने
दूर दूर ती गेली तुडवुन पायाखालीं राने
भान जिवाला नव्हते कसले ! कमला नव्हती कमला !
पायांखाली वाट सरे परि जीव न कोठे रमला
तुडवुन शेतें, गावापासुन बरीच गेली दूर
उन्च कड्यावर कृष्णाकाठीं येउनि थाम्बे स्वैर

नव्हतें कोणी आजूबाजुस रानें होती शान्त,
भेसुरतेनें पहात होता मावळता एकान्त !
मूकपणाचें राज्य पसरलें होतें विश्वावरती
नान्दत होती सुखवायाला, दुखवायाला, शान्ती

कानीं येई मात्र दूरचा मञ्जुळ घण्टानाद
घरा परतल्या खिल्लाराचा पाव्याची वा साद
तुफान भरुनी दुथडी वाहे कृष्णा ! गान तियेचें
सोसाट्याचे शब्द लोपवी भ्यालेल्या पक्ष्याचे
भणभण वारा वहात राहे, गाणे मनि गुणगुणुनी
वंशतरूंतुन गाणें गाई वाऱ्यासङ्गें कोणी !
शोकरसाचे ध्वनी उमटले परि या सर्वांतून
विलापगीते, वाटे, होती सगळीं गात रडून !
डगरीवरचा गेला होता उन्च कडा तुटलेला
पुढती कृष्णेमधे खालती पूरहि होता आला
गरगरगरगर फेसाळूनी भेसुर लाटा खाली
वहात होत्या, भीती दावुन, आपटुनी भंवतालीं !
समोर होता सूर्य चालला हिरमुसला अस्ताला
किरणें होती जात मागल्या पायीं अस्तगिरीला

क्षणात जाउनि उभी ठाकली कमला टोंकावरती
भयाण विश्वावरती फेकी शेवटली ती दृष्टी !
चित्र काढुनी ओच्यातुन मग खिळवी त्यावर दृष्टी
करुण आसवे गाळित, झाली मनीं शेवटी कष्टी
चञ्चल दृष्टी फिरली भंवती मनीं जराशी धाली
हात जोडुनी विनवुन देवा काहीसें पुटपुटली
पुटपुटताना कण्ठ दाटला; हृदयाचा बन्धारा
फुटतां किञ्चित्, वाहुं लागल्या पदरावरती धारा !

चित्रें काही पूर्वस्मृतिचीं झरकन् पुढुनी सरलीं
निरोप घेउनि छायाचित्रा शब्द दोन ती वदली
' सुखांत जातें—आस न काही—दुक्ख न वा आनन्द
दर्शन कुठलं अभागिनीला तुझं अता अरविन्द !   १६१०
सुखशब्दाच्या उपकारानं ऋणी तुझा झालेला
तळमळतो हा जीव किती तव ऋणामधें घालेला
दर्शन कुठलं अभागिनीला, अरु, कुठला आनन्द !
क्षमा करीं मज'—दचके ऐकुन तोंच कुणाचा शब्द !

'कमल !'— बोलुनी पुढें ठाकला मागुनि तों अरविन्द
दृष्टि मिळाल्या ! लख्ख जाहलें पोटीं, ऐकुनि शब्द !
गळलें छायाचित्र ! क्षणभर भाम्बावुन ती गेली !
तरळूं लागे दृष्टी भेसुर पाहे वरती खालीं !   १६१८

---

## पाकळी १५ वी

## कड्यावरून—

दुर्दैवानं पाठ पुरवली येथेही ना देवा !
पराधीन मज मरणहि व्हावं ! कसला छळ हा दैवा !
असेच काही मनात आले असतिल बोल जिवाचे
कानी पडले प्रश्न भीतिचे आतुर अरविन्दाचे
'कमल ! इथं का ? कशास आलिस ? सङ्कट कसलं पडलं ?
भ्यालिस का ग ? अशी फिरविशी दृष्टी का नच कळलं
थरथरती का ओठ ? निथळतं कपाळ का घामानं ?
काय जाहलं बोल, अशी का कापतेस भीतीनं ?
जिवास पडलं कसलं कोडं ? कसला आला वीट ?
धीर धरीं ग कमल ! बोल—का भितेस ? होई धीट.
अधीर झाला जीव ! इथं का कड्यावरी आलीस ?'
विचारताना अरविन्दाचा चाले वेगें श्वास !

दोघे होती शान्त क्षणभर ! शान्त स्थिरचर झालें
महापुराच्या लाटावाचुनि कुणि न कुणाशी बोले
कलला होता अस्तगिरीवर सूर्य पुरा आकाशीं
मुकीं अरण्यें करीत होतीं भयाण एकान्तासी
धीर धरुनि मग, पुरा मनाचा साम्भाळोनी तोल
पाहुनि वरती कमला बोले तळमळलेले बोल

**अभागी कमल !**

अरुभाऊ मज त्यातिल आता नको विचारूं काही
जगात असल्या क्षणहि जगावं वाटत जीवा नाही '
' काय द्यावया जीव, कमल, का येथवरी आलीस !
छे ! भलतं मी करूं न देइन; झालं काय जीवास !
जिवास बसला घाव विखारी तुजला काही खास
बोल बोल वा साङ्गायाला चल दुक्खं आईस
मरूं न देइन तुजला झालं काय असं तरि बोल
नसे ठेवलं देवानं का जिवास काही मोल ! '
मधेंच चावुनि ओठ धिटाई करुन बोले कमला
' मोह जगाचा व्यर्थ कशाला असा घालिशी मजला !
झालं ! गेलं–जीवित सरलं ! पाप पुरं ओढवलं !
कारुण्याच्या अशा जगातुन अता पाहिजे गेलं !
पापं पुरती फेडायाला आम्ही देवापायीं
जावं म्हणुनी बोलवीतसे काळाची ही खाई ! '

'दुखवि न जीवा बोलुन असल ! चल तूं आईजवळी
तव गुण बाबाआई गाती सुखं तिथं तुज सगळीं ! '
' झाली माती पुरी गुणाची ! बोलुनि होई काय !
शीलवतीच्या गुणास आलं मरण कधिच तें–हाय !
ममतेसाठीं, नांवासाठीं, अश्रूंसाठी नाही
जिणं अम्हाला, असून दृष्टी बघणं नच नयनाहीं !
कशास जगणं आता ! झालं जन्माचं मातेरं
ठाउक नव्हतं कीं 'विधवा' हें घरातलं पोतेरं

क्षमा करी मज लवहि न वाटे या मरणाची चाड
पुरे मोह हा ! घालुं नको ही मज शब्दाची भीड !'
' घालुं नको ही भीड तरी का पाहूं डोळा भलतं ?
' दुक्खमुक्त तुज करणं ' ताई, ध्येय एक हें सलतं
जिवास लावुनि घेउं नको, तुज करणं काय जगाशीं ?
नको सङ्कटीं जिवास घालूं हाय खाउनी ऐशी !'

'हाय कुणाची कोण खातसे ! पर्वा मुळि न जगास
कशास आम्ही धरूं सुखाची लवभर आता आस !
वाचा असुनी मुक राहण विधिनं लिहलं भाळी !
आरडून का विधवा गेल्या थोड्या कानिकपाळीं !
घरात गाडुन घेण, घालुन मुखास पुरती खीळ
शब्द शिव्याच्या लाखोंलीचे मुके सोसण हाल !
व्रतोपवासी तनु तापविणं थोर एक हा धर्म
' बोलायाची चोरी ' अमुच्या धर्माचं हे मर्म
'कुणीं फुलावं कुणी हसावं झुरुन मरावं कोणी
पुरुषानं परि सदा हसावं स्त्रीन रडत बसूनी !'
शब्द हेच ना तुमचे बोला ' जग झालं शिरजोर '
का घालावा उगाच आम्ही थोर जगावर भार !
कितीक गेल्या भगिनी ऐशा शीलवती, अरविन्द
अन्धारानं जग कोन्दटलं ! कुणा न याची दाद
थोर अमुचा धर्म न बोले काही अमुच्याकरिता
' रुढी आमुचा खरा जिव्हाळा ' वदे दयेनें जनता

काळ लोटला ! अजूनही परि जगात अमुचं हासं
अनाथ होतां व्हावं ! शोभे जनतेला हें खासं ! '

' उघड्या डोळां मरण पाहुनी आजवरी भगिनीचं
मेली आहे नजर जगाची ! काय तुम्हा मग त्याचं !
शब्द सुखाचा महाग झाला ! होय गुणाची माती !
जगणं मरणं समान झालं ! कशास जीवा खन्ती ?
घरिं दुक्खानं झुरतों ! दारीं लाथा वरती बसती
अमुच्या हातीं होतें निर्मळ कळ्याफुलाची माती !
विटाळतं जळ ! धर्महि बुडतो आमुच्या हातीं नीच !
देव रोषतो ! जनास अमुचा रात्रन्दिन हा जाच
पतिधन गेलं ! शील राहिलं होतं आम्हाजवळी
' विधवेला परि शील न ' जग हें बोले ' लिहिल भाळीं ! '
प्रियबन्धूसह बोलायाची झाली आम्हा चोरी
स्वातन्त्र्याचं नांव कशाला दृष्टी होय विषारी
अधर्म झाला अमुच्या पायीं म्हणुनि विषारी कांटे
टोंचुनि, जनता मारी आम्हां–हाय ! हृदय हें फाटे !'

दोन आंसवें पदरावरतीं टप्‌कन् तोंच गळालीं
खालीं पाहे अरविन्दहि मुख झांकुनि निजकरजालीं
सुम्भ जाहली वृत्ति ! हरपलें भान कळेना काही
भास, बोलणीं स्वप्नामधलीं जागेपणिंचीं वा हीं !

आवेगानें कमला बोले अश्रु करानीं पुसुनी
‘ काय जगावं जगांत आम्ही असेच अश्रू टिपुनी ?
सोसावे ना हाल सदांचे ! शीलवन्त जग सारं
कशास जगणं ? परदुःखाचं शीतळ कीं नच वारं ?
भावभावना हृदय न आम्हा दिधलीं का देवानं ?
मृतहृदयांनीं काय जगावं साञ्जा अपमानानं ?
साञ्जा येउन काय करावं; वाटे जावं दूर— ”
लाल जाहली बोल बोलता, भेसुरला मग सूर !

करात झाकुनिया मुख सोसुनि तीव्र जिव्हारी शब्द
भ्रान्त जाहला क्षणभर विव्हल होउनिया अरविन्द
स्वप्नसृष्टि वा सत्यसृष्टि हे मनास कळले नाहीं
मिटल्या डोळा अनाथदुक्खें हृदय एकलें पाही
चूर जिवाशी क्षणभर होई भ्रान्त क्षणभर होई
न कळे केव्हा कमला खालीं उडी झोकुनी देई ! !

बन्द जाहली भाषा ! गेले भ्रान्तीचे क्षण दोन
भेसुर एकान्तानें जागे करिता करि वर मान
डोळे फाडुन समोर बघता दिसलें नाही काही—
दिसलें नाही काही म्हणुनी सभोवतालीं पाही
गरगरणाऱ्या भीत दृष्टिला जळांत दिसता काही
उडी झोंकुनी देई खालीं नदींत वरुनी तोही !
वाऱ्यावरल्या तीरापरि तो पोहत गेला दूर
झाली होती मूर्छित कमला लाटांनीं बेजार

## अभागी कमल !

खालीं, वरती जाता दिसले कुन्तल अरविन्दाला
गेला जवळी—हाय ! वृक्ष तों वरुनी वाहत आला !
लाट लागली ! कमल अभागी—गेली ! कायम गेली !
झोकायाला दूर तयाला लाट अन्य तों आली
आली दुसरी—तिसरी— आल्या आणिक दुसऱ्या दोन
पुढती गेल्या अरविन्दाला अन्य तटीं झोकून !
मूर्छित होउनि पडला काठीं कळकीच्या बेटात !
अस्ता गेला सूर्य ! माण्डिला टिटव्यानीं आकान्त ! ! १८१०

व्याकुळ होउन वदन आपुले झाकी सन्ध्यादेवी
आकाशातुन दात विचकुनी कुणी वाकुल्या दावी
अन्धाराने विश्व कोन्दलें ! मिटलीं कमळें ! भृङ्ग—
करूं लागले पद्मिनीतुनी एकान्ताचा भङ्ग ! १८१४

---

## उपसंहार

# पुन्हा कृष्णाकांठीं

पहाट झाली,--रङ्ग रङ्गले आकाशातुन लाल
झुन्जूमुन्जू झालें फेकी मुठिंनीं कुणी गुलाल
ताम्बुस गगनामधुनी गेले वाहत पहाटवारे
काही लपले काही अस्फुट उदया आले तारे
दरवळला सौगन्ध भोवती फुलातुनी आलेला
किल्बिल् किल्बिल् मञ्जुळतेचा किल्बिलाटही झाला
मळसळली वर वाऱ्यामधुनी चमकत पिम्पळपाने
डगरीवरली डोलुं लागली हिरवी बाभुळरानें
ओढ्याकाठीं निवडुङ्गातुन वरति करन्जे आले
वाकवाकुनी जळीं कण्हेरी रूप पहाती आपुलें
दाट निर्गुडी तटिंच्या हलता सळसळ वाऱ्यासङ्गें
मधुन पाण्ढरीं हिरवीं दिसलीं उलटीसुलटीं अङ्गें
' हु हूं हु हूं हूं ' फान्दीवरती एक आरडे होला
शब्द कापले, फिरता खालीं वर वाऱ्याचा झोला !
डोलत होतीं कळकी बेटें, केन्जळ कृष्णाकाठीं
तेज उदेलें जराजरासें अन्धाराच्या पोटीं
मघेंच चमके फेसाळोनी गेलेलें जल खालीं
तरुंचीं पानें दिसूं लागलीं अन्धारीं लपलेलीं
पञ्च पञ्च या उषःकालच्या समयीं शान्त गभीर
कड्यावरी कुणि बसला होता धीर मनाचा वीर

हातीं घेउनि कागद काही पाहे वरती खालीं
वाचवाचुनी विचार करूनी पाहि पुन्हा भवतालीं
रङ्ग नभाचे, अन्तरङ्गिच्या विचार लाटांवरले
मुखि चमचमुनी क्षणैक, दिसले क्षणांत पालटलेले !
हातीं घेउनि तेंच कायसें, स्थिरवी त्यावर दृष्टी
विश्व सांठलें त्यातच वाटे त्याला विरली सृष्टी
दीर्घ उसासे सोडुन, पाही करुन जरा वर मान
खालीं वरती पाहे, गेलें जणूं जिवाचें भान !
पहा ! पहा ते आले ! झरले अश्रू डोळ्यांतून !
खालीं वाकुनि पाहे—बोलवि कुणि का कृष्णेतून ?

कमलकरातुन गळलेलें तें होतें छायाचित्र
साङ्गत होतें अरविन्दाला सातिचें सर्व चरित्र
उत्सुकतेनें प्रेमळतेनें चित्र पाहता असलें
हृदय पोळले ! शब्द कापरे, तों काहीसें दिसले !
आवेगानें उठला ! बसला वाचुनि परि तों शब्द
हळुवार मनें वाचूं लागे तेंच तेंच अरविन्द !

विरूं लागले अन्धाराचे डोङ्गर जरि गम्भीर
काळोखाचें काहुर होतें आत माजलें थोर !
वेड्या जीवा मुळीं न वाटे अता मृत्युची भीती
भ्रान्तीचे क्षण जातां, पावे भङ्ग मनाची शान्ती
नैराश्याकुल होऊन दुक्खी मनांत झाला चूर
पूर्वस्मृतिंनीं जीव हालुनी भरून आला ऊर

पाय चालले पुढे जरा; मन भिरभिरलें मोकाट
शेवट लावाया जीवाचा गेला पुढती नीट
शब्द वाचुनी पण गोन्धळला ! परतुनि ये माघारी
हासे त्याला लहरी, खालुन येणारीजाणारी !

पुन्हा जिवाचे शब्द वाचले—गहिंवरला तो हृदयीं
ओठ हालले—अङ्ग थरारे—पुटपुटला मग काही
वाचूं लागे—' जिणं सम्पलं—सोसवे न हा आळ !
होतिल तव अरु, हाल इथं मी जगता काही काळ
अभागीण मी—क्षमा करी मज—येतें मी अरविन्द,
अभागिनींना सोडव दुसऱ्या—लिहिला तरी हा शब्द !
लावुनि घे नच जिवास आता कर्मकथा घडणारी
बालपणीची ' कमल ' तुझी मी ऋणी सदा असणारी
शब्द कांपरे दावित होते मनिंचा निश्चय, भीती
ब्रह्माण्डातिल दुक्खें भरलीं अरविन्दाच्या चित्तीं !
गहिंवर फुटला आवेगानें—दाबवे न मग कण्ठ
फुटे अश्रुला वाट, लागला रडावया एकान्त !

शोक जाहला जिवास ! आणी गहिंवर करुणावाणी
दाबुनि हृदयीं परी उमाळा बोले करूण वचांनीं
' आळ तुजवरी ! कमल, कशाचा ! कसले होतिल हाल !
गेलिस माझ्यासाठी तूं का ! —हाय ! लागती बोल !

## अभागी कमल !

येऊं का मी कमल–नको पण ! शब्द तुझा पाळाया–
निष्प्रेमाच्या जगांत वसतों तुजविण शून्य मनें या !
पण जीवाचा स्वार्थ कशाला ! छे– पण कर्मकहाणी
सकला कैशी कळेल, गेली जर ही करुणावाणी !
जगणं मरणं समान झालं जिवास नैराश्यानं
जीव जगविणं दैवीं आलं केवळ तव शब्दानं–'
बोले, येई परी उमाळा, जाई टोंकावरती
पाहूं लागे हळूच खालीं, पुढती, मागें वरती !

पूर्वक्षितिजीं तेजानें कड सारविली जरि कोणीं
अजून होत्या जरा थाम्बल्या कुणी तारका गगनीं
पूर्वेला तों नुकती कोणी तारा उदया आली
अरविन्दाची फिरणारी तों दृष्टी तीवर गेली
शुभ्र हांसऱ्या तेजावरती खिळली दृष्टी दिव्य
दिसूं लागलें मन्दिर तेथे स्वर्गाचें नव भव्य !
मन्दिर होतें ताऱ्यावरच्या तेजांनीं रचिलेलें
चमकत होतें वाटे स्तम्भहि तेजांचे केलेले
रचिलें होतें नव सिंहासन विद्युद्रत्नमण्यांचें
लखलखाट वर चौकामध्यें होई आकाशाचे
तेतिस कोटी देव बैसले सभोंवताली खालीं
परि विधवेची मूर्ती कोणी उच्च आसनीं दिसली !
'कमल'! कमल ! ही साङ्ग तूंच ना !' बोट दावुनी वरती
वळूं लागे जरा भ्रमानें अरविन्दाची मूर्ती

'देवांनीं तुज उच्चपदीं या बैसविलें मानानें
छळिलें परि तुज पायाखालीं तुडवुन हाय ! जगानें
नीच जगाला सोडुन गेलिस देवाच्या भेटीला ?
निवले डोळे ! कळ्या घेउनी सेविशि योग्य पदाला
दुःखी लोटुन हासतेस मज—! येऊं का मी वरती ?
येउ ? काय—मी नको—नको मी ? ' निवळूं लागे भ्रान्ती
परन्तु नव्हतें ताम्बुस गगनी कुणी तारकावीण !
कळले कीं, हा भास भासला, होता मन हैराण !

बसला खालीं—पुरी निमाली अता मनाची भ्रान्ती
अनुभूतीच्या तत्त्वज्ञानीं मिळे मनाला शान्ती
तेज साचले कणाकणातुन ! विचार चित्तीं आले
करुणावाणी ध्येय दाखवी, निश्चित काही ठरलें !
मुखीं चमकलें तेज, एक तों हात ठेवुनी हृदयीं
दुसरा ठेवुन चित्रावर तो शपथ जिवाची घेई—
'अभागिनीचीं करीन दुःखें दूर उपायीं खास
कमल, जिवाला संसाराचा ठेवित नाही पाश !
कार्य करिन हें देशकारणीं तनमनधन लावून
शपथ वाहतों संन्यासाची, कमल, तुला मी स्मरुन— !'
बोलुन ऐसें उठला ! गळले टप्‌कन डोळ्यातून
करुणशान्तिचे अश्रू खाली खडकावरती दोन !
तसाच गेला परतून घरा, घेउन छयाचित्र
आतिल डोळे पहात होते अभागिनीचें चित्र !

नूतन तारा हसली—गेली क्षणात लोपुन गगनीं
वर वर होतें तेज येत, परि सूर्य न आला अजुनी !

# रविकिरणमण्डळाचीं पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| १ | किरण ( गद्यपद्य, मण्डळ ) | ८४ |
| २ | काव्यविचार ( काव्यविषयक निबन्ध, मण्डळ ) | १ |
| ३ | उषा ( पद्य, मण्डळ ) | ८१२ |
| ४ | मधुमाधव ( पद्य, घाटे–माधव जूलियन् ) | ८१२ |
| ५ | शलाका ( गद्यपद्य, मण्डळ ) | १ |
| ६ | विरहतरङ्ग ( खण्डकाव्य, माधव जूलियन् ) | ८८ |
| ७ | कला ( खण्डकाव्य, गिरीश ) | ८६ |
| ८ | नाट्यरूप महाराष्ट्र (ऐतिहासिक प्रवेश, विठ्ठलराव घाटे) | १ |
| ९ | छन्दोरचना (मराठी वृत्तशास्त्र, प्रो. मा. त्रि. पटवर्धन) | २ |
| १० | प्रभा ( गद्यपद्य, मण्डळ ) | ८८ |
| ११ | सुधारक ( खण्डकाव्य, माधव जूलियन् ) | १८८ |
| १२ | आम्बराई ( खण्डकाव्य, गिरीश ) | १ |
| १३ | यशोधन ( पद्य, यशवन्त ) | १८८ |
| १४ | उमरखय्यामच्या रुबाया (पद्य, प्रो. मा. त्रि. पटवर्धन) | १८८ |
| १५ | भावमन्थन ( पद्य, यशवन्त ) | ८८ |
| १६ | काञ्चनगङ्गा ( पद्य, गिरीश ) | १८८ |
| १७ | द्राक्षकन्या ( पद्य, माधव जूलियन् ) | ८१२ |
| १८ | बन्दीशाळा ( पद्य, यशवन्त ) | १८८ |
| १९ | गज्जलाञ्जलि ( पद्य, माधव-जूलियन् ) | १ |
| २० | जयमङ्गला ( खण्डकाव्य, यशवन्त ) | १ |
| २१ | फलभार ( पद्य, गिरीश ) | ८१२ |
| २२ | अभागी कमल ( खण्डकाव्य, गिरीश ) | १ |
| २३ | स्वप्नरञ्जन ( पद्य, माधव जूलियन् ) | छापत आहेत |
| २४ | यशोगन्ध ( पद्य, यशवन्त ) | छापत आहेत |

पत्ता— रविकिरणमण्डळ, ५६५ नारायण, पुणें २